# ॥ अमृतगाथा ॥

(संत प्रल्हादमहाराज बडवे जीवनचरित्र)

वेदमूर्ती स. कृ. देवधर



ओंकार प्रकाशन, पुणे

## लेखक परिचय



**नाव :** सखाराम कृष्णाजी देवधर

**जन्म :** किर्लोस्करवाडी, जि.सांगली

दिनांक- फाल्गुन वद्य एकादशी (पापमोचनी एकादशी) शके १८४७ बुधवार १० मार्च १९२६.

**व्यवसाय :** १) महाराष्ट्रशासन- सहकार खाते ३६ वर्षे सेवक राजपत्रित अधिकारी म्हणून ३१ मार्च १९८४ रोजी निवृत्त, २) लेखन ३) वेद, उपनिषदे, ज्ञानेश्वरी व अन्य संतग्रंथांचा अभ्यास.

**मूळगाव** - पालगड, ता.दापोली, जि.रत्नागिरी.

**काही ठळक गोष्टी :** ● वयाच्या ११व्या वर्षी मौजीबंधन व गायत्रीची दीक्षा- तेव्हापासून गायत्री उपासना चोवीस लाख जपाचे एक याप्रमाणे गायत्रीची सहा पुरश्चरणे झाली.

● वयाच्या १४ वर्षी गुरुवर्य वै.रघुनाथ केशव तथा दादा म्हाळगी यांच्याकडून ज्ञानेश्वरीचा लाभ तेव्हापासून ज्ञानेश्वरी वाचन, मनन, चिंतन आणि आचार.

● १९९२-९३ मधील देवदेवेश्वर संस्थान पेशवे पुरस्काराने सन्मानित.

● अनेक अध्यात्मिक श्रेष्ठांचा सहवास व विद्यालाभ.

● **एकूण ग्रंथ संपदा**

| | |
|---|---|
| स्वतंत्र पुस्तके | २३ |
| संपादित | १ |
| अनुवादित | ४ |
| एकूण | २८ |

✦ AMRUTGATHA
Written By : S. K. DEODHAR

✦ **प्रकाशक**
**ओंकार प्रकाशन,**
द्वारा : विद्याधर ताठे,
धनकवडी पोस्टाजवळ,
गाभणे इमारत २ रा मजला,
धनकवडी, पुणे ४११ ०४३

✦ **मुद्रक**
प्रदीप मुनोत,
प्रभात प्रिंटिंग वर्क्स,
४२७, गुलटेकडी, पुणे ४११ ०३७

✦ **प्रकाशन**
शके १९१५ श्री विठ्ठल मंदिर पंढरपूर

✦ **मुखपृष्ठ**
चित्रकार : भारत गदगे
मांडणी : समीर गोरे

✦ **किंमत रु. ५०/-**

# ॥ प्रकाशकाचे मनोगत ॥

## मम नमन असो त्या भक्त प्रल्हादराया ।

'मना सज्जना', व 'एक तरी ओवी अनुभवावी' या दोन ग्रंथांच्या यशस्वी प्रकाशनानंतर 'ओंकार प्रकाशन' तर्फे 'अमृतगाथा' हा प्रस्तुत तिसरा ग्रंथ आपल्या हाती देताना आम्हास विशेष आनंद होत आहे. आमचे बालपण पंढरपुरी तरटी दरवाजाजवळील प्रल्हादमहाराजांच्या वाड्यात खेळण्यात-शालेय गृहपाठाच्या अभ्यासात गेले असून तेव्हापासून आमच्या मनात त्यांच्याबद्दल एक विशेष आदर वसत आला आहे. प्रल्हादमहाराजांचे जीवन एक अलौकिक 'अमृतगाथा' आहे त्या अमृतागाथेचे प्रकाशन करण्याचे आम्हास भाग्य लाभावे ही त्या बालपणीच्या भावबंधाचीच **'तयाचा वेलू गेला गगनावरी'** अशी अक्षरत्व धारण करून प्रगटलेली अमृतवेल आहे. हे देवदुर्लभ भाग्य ज्या सुहृदांमुळे लाभले त्या सर्वांचेच आम्ही मनस्वी ऋणी आहोत.

वारकरी संतांनी केलेल्या अलौकिक कामगिरीमुळे महाराष्ट्राचे 'महाराष्ट्र' हे नाव अधिक सार्थ झालेले आहे. तथाकथित बुद्धीवाद्यांनी आमच्या संतांवर टाळकुटे म्हणून वेळोवेळी टीका केलेली आहे. पण या संतांनी पंढरीच्या वाळवंटात फुलवलेली सामाजिक समता, संतांनी केलेले वर्ण-जातीभेदाचे उच्चाटण, शूद्र देवतापूजन-बळीबकरे-गंडेधुपारे यांचा निषेध, वेदवंचित समाजाला नाममहात्म्याचा मंत्र देऊन तळागाळातील समाजाला प्राप्त करून दिलेला आत्मसन्मान आदिकडे तथाकथित बुद्धीवाद्यांनी सोईस्करपणे डोळेझाक करून आपल्या बुद्धीवादी दृष्टीचा (?) एककल्ली व हटवादीपणाच दाखवून दिला आहे.

संत ज्ञानदेवांची पारमार्थिक समता, संत नामदेवांची पंजाब विजययात्रा,

संत एकनाथांच्या भावार्थ रामायणाने मृतवत क्षात्रतेजाला दिलेली संजीवनी, संत तुकारामांच्या अभंगातून शिवशक्तीमागे उभी केलेली जनशक्ती, संत रामदासांनी सज्जनांना समर्थ बनविण्याची केलेली किमया या संतकार्याकडे तथाकथित बुद्धीवादी अभ्यासकांनी केवळ दुर्लक्षच केले नाही तर उलट त्याबाबत जनसामान्यांचा करता येईल तेवढा बुद्धीभेद करण्याचे पाप केलेले आहे. आमच्या वारकरी बांधवांनी व विशेषतः मठाधिपती, फडकऱ्यांनी आता भजन-पूजन, प्रवचन-कीर्तन याबरोबरच समाजाचा बुद्धीभेद करणाऱ्यांना वेळच्या वेळी सडेतोड उत्तर देण्याची गरज आहे.

संतांचे माहेर व विठूरायाची पुण्यनगरी पंढरपूरचे सुपुत्र संत प्रल्हादमहाराज यांचे कार्यही वरील संतांप्रमाणेच ऐतिहासिक मोलाचे आहे. औरंगजेब व अफजलखान या धर्मांध मूर्तीभंजकांच्या राक्षसी आक्रमणापासून विठ्ठलमूर्तीचे प्राणपणाने रक्षण करण्याचे प्रल्हादमहाराजांनी केलेले कार्य विशेष महत्त्वाचे आहे. त्याबाबतची ऐतिहासिक कागदपत्रे आज उपलब्ध असून एखाद्या विद्वान अधिकारी अभ्यासकाने ही सारी कागदपत्रे पाहून प्रल्हादमहाराजांच्या कार्याचे ऐतिहासिक महत्त्व लोकांना पटवून देण्याची गरज आहे. प्रस्तुत अमृतगाथेच्या प्रकाशनामागे लोकांचे, अभ्यासकांचे प्रल्हादमहाराजांच्या कार्याकडे लक्ष वेधणे हाच एकमेव उद्देश आहे. ही अमृतगाथा वाचून कोणी अभ्यासक या विषयाकडे वळला तर 'एवढ्याचसाठी केला होता अट्टाहास' या संतवचनाच्या भावार्थाने आमचे मन आनंदून जाईल.

गेल्या वर्षी माघ महिन्यात वेदमूर्ती स. कृ. देवधर यांना प्रल्हादमहाराज पुण्यतिथी उत्सवानिमित्त श्रीक्षेत्र पंढरपूरी घेऊन येण्याची जबाबदारी समस्त बडवे मंडळींनी आमच्यावर सोपविली होती. त्यावेळीच उत्सव समितीतर्फे प्रल्हादमहाराजांचे चरित्र आपल्यासारख्या अधिकारी पुरुषाने लिहावे अशी आम्ही श्री देवधरकाका यांना विनंती केली होती. 'बोले तैसा चाले' या वचनाप्रमाणेच त्यांनी ठरल्यावेळी प्रल्हादमहाराजांचे चरित्र लिहून हस्तलिखित आमच्याकडे पाठविले व सर्वांनाच थक्क केले. देवधरकाकांचा व आमचा फार वर्षांचा श्रद्धासंबंध आहे. त्यांचा कृपालोभ आमचा निजधन ठेवा आहे. या ग्रंथाच्या रूपाने आमच्या आजवरच्या संबंधास अक्षररूप प्राप्त झालेले आहे. हे आमचे भाग्य आहे. या ग्रंथास देवधरकाकांसारखेच आदरणीय असे आमचे

स्नेही श्री विवेकानंदमहाराज वासकर यांची प्रस्तावना लाभलेली आहे. वासकर व प्रल्हादमहाराज यांचे पिढ्यानपिढ्यांचे संबंध आहेत. तसेच शिवशाहीर श्रीमंत बाबासाहेब पुरंदरे, पुणे विद्यापीठाच्या 'डी.लिट' पदवीने सन्मानित डॉ. भा. पं. बहिरट व पुणे विद्यापीठाच्या तत्त्वज्ञान विभागातील कुशाग्र विद्वान व संत तुकोबारायांचे वंशज डॉ. सदानंद मोरे या मान्यवरांचे या ग्रंथास लाभलेले पुरस्कार प्रल्हादमहाराजांच्या कार्याचे मोठेपण पटवून देणारे आहेत. या मान्यवरांनी वेळेत वेळ काढून दोन शद्ब लिहून दिले ही प्रल्हादमहाराजांचीच पुण्याई.

या ग्रंथसिद्धीसाठी समस्त बडवे मंडळींनी आपल्या घरचे कार्य समजून लागेल ते सर्व सहकार्य दिलेले आहे. विशेषतः सर्वश्री बाबासाहेब बडवे, अनिलराव बडवे, एन. ए. बडवे सर, आप्पासाहेब बडवे यांच्या तत्पर व स्नेहभावी सहकार्यामुळेच हा ग्रंथसिद्धीचा संकल्प पूर्णत्वास गेलेला आहे. या प्रकाशनासाठी सहकार्य लाभलेल्या ज्ञात-अज्ञात सर्व सहकाऱ्यांना पुनःश्च एकदा धन्यवाद देऊन आम्ही ही 'अमृतगाथा' श्री विठ्ठलरुक्मिणी चरणी अर्पण करीत आहोत. असेच भाग्य पुन्हा पुन्हा लाभावे ही प्रार्थना!

**मम नमन असो त्या भक्त प्रल्हादराया ॥**


## विद्याधर ताटे

**गाभणे इमारत, पोस्टाजवळ,**
**धनकवडी, पुणे ४११ ०४३**

# ॥ प्रस्तावना ॥

॥ श्री ज्ञानेशो भगवान विष्णुः ॥

## चरणीं ठेविजे माथा । हेंचि भलें ॥

'श्री ज्ञानदेवे रचिला पाया' या उक्तीप्रमाणे वारकरी सांप्रदायाची जी इमारत तयार झाली त्यामध्ये श्री प्रल्हादमहाराज बडवे यांच्या कामाचा मागोवा त्यांच्या चरित्रप्रकाशनाच्या रूपाने श्री ओंकार प्रकाशन घेत आहे ही एक अत्यंत स्तुत्य व काळाची गरज आहे. श्री प्रल्हादमहाराजांची सेवा या ना त्या रूपाने वासकर घराण्याकडे कधी सहज कधी बोलावून तर कधी अपरिहार्यपणे गेल्या ९ पिढ्या येत आहे. माझ्या मागच्या पिढीने म्हणजे माझे वडील ह.भ.प. आप्पासाहेब वासकरमहाराज यांच्या हस्ते श्री प्रल्हाद महाराजांच्या मंदिराचा जिर्णोद्धार समस्त बडवे समाजाने घडवून आणला. आताची ही प्रस्तावना देखिल श्री प्रल्हादमहाराज बडवे व वासकर घराण्याच्या पिढ्यान् पिढ्यांच्या संबंधाचाच एक भाग आहे असे दिसते.

श्री ज्ञानेश्वर महाराजांच्या समाधी सोहळ्यासाठी दरवर्षी कार्तिक पौर्णिमेला आमची दिंडी आळंदीला जाते. त्या दैवदुर्लभ सोहळ्यासाठी श्री नामदेवमहाराज श्री पांडुरंगासवे आळंदीला गेले अशा अनेक ठिकाणी संतवाङ्मयामध्ये उल्लेख आहे व त्यामुळे आजही पांडुरंगाला आळंदीचे आमंत्रण देण्याची ९ पिढ्यांची आमची परंपरा आहे व ते आमंत्रण आम्ही देवळात जाऊन देत नाही तर श्री प्रल्हाद महाराज बडवे यांचे घरी देतो. याचे कारण असे की, देव रात्री श्री प्रल्हादमहारजांचे घरी 'सारीपाट' खेळण्यासाठी जात. आमंत्रणासाठी देवळात गेल्यावर हा प्रकार आमचे पूर्वजांच्या लक्षात आल्यावर हे आमंत्रण श्री प्रल्हादमहाराजांचे घरी देण्यात आले व तीच प्रथा आजही चालू आहे.

**'शुचीनां श्रीमतां गेहे'** या न्यायाने हा योगभ्रष्ट महात्मा श्री बडवे घराण्यामध्ये अवताराला आला आणि ६ व्या अध्यायात सांगितलेल्या सर्व

ज्ञानाच्या खुणा 'उपजताचि ज्ञानी' या प्रमाणे त्यांच्या ठिकाणी प्रगट झाल्या.

**ते चालते ज्ञानाचे बिंब। तयाचे अवयव ते सुखाचे कोंभ।**
**येर माणूसपण भांब । लौकिक भागु' ॥**

या ओवीने त्यांचे वर्णन करता येईल. वेदान्ताच्या प्रस्तानत्रयीचा, सर्व शास्त्र पुराणांचा, भागवताचा अभ्यास करून ते केवळ 'वेदान्ती' झाले नाहीत तर त्यांना विशेष आकर्षण होते ते श्री ज्ञानेश्वरी व अमृतानुभावचेच! त्यातल्या त्यात त्यांचा अमृतानुभवाचा अभ्यास हा एक नवलाचा भाग आहे. श्री एकनाथ महाराजांनंतर अमृतानुभव या ग्रंथाचा अभ्यास केवळ प्रल्हाद महाराजांनीच केला असे म्हणाल्यांस काही गैर नाही. त्या पाठीमागे देखिल एक कारण आहे. श्री ज्ञानेश्वर महाराजांचा 'अमृतानुभव' हा एक सिद्धीचा अनुवाद आहे. प्रत्येक प्रकरणाच्या शेवटी ते लिहितात 'इति श्री सिद्धानुवादे श्रीमदनुभवामृते.

ज्ञानदेवांचे सारे साहित्य श्रीं माऊली संवादाबरोबर समाजाशी संवाद साधणारेच आहेत. श्री चांगदेव पासष्टी हा मित्रसंवाद आहे. अभंग हे देवसंवाद आहे तर अमृतानुभव हा ज्ञानेशाचा आत्मसंवाद आहे. तो एका सिद्ध पुरुषाचा आत्मसंवाद आहे. ज्ञानेश्वरीच्या तुलनेत अमृतानुभव ग्रंथाच्या अभ्यासकाकडे सहसा (अपवाद सोडून) प्रवृत्ति होत नाही; परन्तु प्रल्हाद महाराजांची आध्यात्मिक पातळी 'सिद्धानुवादाचीच असल्याने या अलौकिक ग्रंथाचे **'समश्लोकी'**मध्ये रूपांतर करण्याचे कार्य हे श्री प्रल्हाद महाराजांच्या असामान्य व्यक्तित्वाचा एक आगळा पैलू आहे.

या 'समश्लोकी' ग्रंथाबरोबरच प्रल्हादमहाराजांचे अभंग, आरती, आख्याने आदि वाङ्मय उपलब्ध आहे परंतु त्याचा मागोवा व ती समाजापर्यंत पोहचली गेली नाहीत. त्यांच्या कवी मनाची ओळख नवीन पिढीला होणे अत्यंत जरूरीचे आहे.

वारकरी सांप्रदायामध्ये जे 'ज्ञानोबा-तुकाराम' भजन सुरू झाले ते श्री प्रल्हाद महाराजांपासून सुरू झाले. त्यापूर्वी 'रामकृष्णहरि' एवढेच भजन होत असे. **'तुका म्हणे पापे । जाती संताचीया जपे** ॥ या अभंगाप्रमाणेच वारकऱ्यांचा 'ज्ञानोबा-तुकाराम' हा मध्यमपदलोपी समास आहे. पायापासून कळसापर्यंत नेणाऱ्या या महामंत्राचा पहिला उद्‌गाता म्हणून प्रल्हादमहाराजांचा निर्देश ही

वारकरी सांप्रदायाची अभिमानाची गोष्ट आहे.

इतर संतांप्रमाणेच श्री प्रल्हाद महराजांचे जीवनामध्ये 'चमत्कार' आहेत. पण संतांच्या या चमत्काराचे स्वरूप हे अत्यंत वेगळे आहे. **'हे तो तुमची सहज स्थिती । निर्जिव चालविली भींती ॥** सहज अवस्थेतील भक्तीमुळे लोकांना ते चमत्कार वाटतात. पण प्रत्येक चमत्काराला वैज्ञानिक उत्तर आहे.

श्री प्रल्हाद महाराजांच्या कर्तृत्वाचा आणखी एक ऐतिहासिक पैलू म्हणजे श्री पांडुरंग मूर्तिचे संरक्षण! या त्यांच्या कर्तृत्वामुळे आजचाच नव्हे तर भविष्यातील सर्व वारकरी सांप्रदाय त्यांचा ऋणी राहील. त्यांचे ते ऋण फेडण्यापेक्षा ह्या ऋणांच्या अभिमानात राहण्यामध्ये आम्हा वारकऱ्यांना आनंद आहे.

या अमृतगाथेचे लेखन सिद्धहस्त लेखक आमचे बापू तथा स. कृ. देवधर यांनी मोठ्या रसाळपणे केलेले आहे. त्यांना स्तुती केलेली आवडत नाही पण त्यांचे हे कार्य माऊलीच्याच शद्बात सांगायचे तर 'प्राणापरौते। आवडती हे निरूते । जे भक्त चरित्राते । प्रशंसिति ॥' अशा कुळीतील आहे. या गाथेचे प्रकाशन आमचे सुहृद परममित्र पत्रकार विद्याधर [illegible] यांच्या ओंकार प्रकाशन तर्फे होत आहे ही सुद्धा विशेष योगायोगाची व आनंदाची गोष्ट आहे. ओंकार प्रकाशनचे 'मनासज्जना' व 'एक तरीओवी अनुभवावी' ही प्रकाशने संत साहित्यातील दोन मौलिक व संग्राह्य ग्रंथ रत्न आहेत. 'अमृतगाथा' सुद्धा त्या दर्जाचेच एक मौलिक प्रकाशन ठरेल यात शंका नाही.

श्री प्रल्हाद महाराज यांच्या या अमृतगाथेमध्ये मला माझी वाकपुष्पांजली शद्बांकित करण्याचा आलेला हा योग मला एक पर्वणीच वाटतो. ही वाकपुष्पांजली प्रल्हादमहाराज चरणी सादर अर्पण!

**- विवेकानंद ज्ञानेश्वर वासकर**

**वासकर वाडा,**
**प्रदक्षणा मार्ग, पंढरपूर,**
**चैत्र पाडवा, शके १९१५**

# ॥ प्राक् कथन ॥

प्रल्हादबुवा बडवे यांचे नाव एक संस्कृत पंडित म्हणून मला परिचित झाले ते ज्ञानेश्वर महाराज यांच्या अमृतानुभवावर त्यांनी केलेल्या संस्कृत समश्लोकीमुळे. इ.स. १९२९ मध्ये हे पुस्तक प्रकाशित केले गेले. या २०५ पानांच्या पुस्तकाची किंमत केवळ एक रुपया होती. हे पुस्तक १९५१ मध्ये मी पुण्याच्या जुन्या बाजारात चार आण्यांना खरेदी केले ते ज्ञानेश्वर महाराजांचा सर्वोत्तम ग्रंथ म्हणून. या पुस्तकात मूळ ज्ञानेश्वरांची ओवी, प्रल्हादबुवा बडवे यांची संस्कृत समश्लोकी आणि कै. बाबा गर्दे यांची मराठी आर्या यांचा समावेश आहे.

माझे गुरुवर्य वै. रघुनाथ केशव म्हाळगी तथा दादा म्हाळगी यांच्या तोंडून ज्ञानदेवांच्या अमृतानुभवाची थोरवी ऐकली होती. हे पुस्तक मी ज्या वेळी त्यांना दाखविले तेव्हा ते म्हणाले, प्रल्हादबुवा एक महान पुरुष होऊन गेले. त्यांच्यामुळेच वारकऱ्यांच्या जिभेला अक्षय्य मधुता देणारा 'ज्ञानबा-तुकाराम' हा मंत्र बाहेर आला. त्याची कहाणीही त्यांनी मला सांगितली. पुढे संस्कृत समश्लोकीवरून ज्ञानदेवांच्या ओवीचा मागोवा घेण्याचा मी प्रयत्न केला तेव्हा मात्र मला त्यांच्याबद्दल अतिशय आदर वाटू लागला. पुढे त्यांच्याबद्दल अधिक माहिती मिळविण्याचा प्रयत्न केला पण फिरतीच्या सहकारी खात्यातील नोकरीमुळे तो प्रयत्न जागच्या जागीच राहिला.

१९८५ च्या आजारपणात मी पुन्हा अमृताचा आस्वाद घेण्याचे ठरविले. त्यावेळी मला ज्या अनेक लोकांचे अप्रत्यक्ष सहाय्य लाभले त्यामध्ये संत वाङ्मयाचे अभ्यासू पंडित भा. पं. बहिरट यांनी नागपूरच्या जीवन विकास मासिकाच्या डिसेंबर १९९८२ मध्ये प्रल्हादबुवांवर लिहिलेल्या लेखाचा प्रामुख्याने उल्लेख करावा लागेल.

त्यानंतर १९९१ साली श्री. विद्याधर ताठे यांच्या समवेत पंढरपूर येथे

प्रवचनासाठी गेलो असता श्री अनिलराव बडवे आणि अन्य बडवे मंडळींचा परिचय झाला. त्यावेळी मी त्यांना प्रल्हादबुवांच्या थोरवीबद्दल बोललो तेव्हा त्या सर्वांना आनंद झाला. पंढरपूर येथील होळकर वाड्यात बुवांचे समग्र वाड्मय व्यवस्थित ठेविले आहे. होळकर वाड्याचे व्यवस्थापक ज्यांना आम्ही प्रेमाने मामा म्हणतो त्यांनी ते सर्व माझ्या स्वाधीन करून अभ्यासाला मोठा हातभार लावला. तेथील ती अक्षरसंपदा पाहून प्रलहादबुवांचे चरित्र अक्षरांकित करण्याचा विचार मनात आला. पांडुरंगाचे दर्शन घेताना मी माझा संकल्प प्रभूंना सांगितला आणि एकदम विचारांना गतिं मिळाली.

त्या संकल्पाप्रमाणे जेवढे प्रयत्न करता आले तेवढे करून पंढरपूर येथील बडवे मंडळींनी दिलेल्या आणि प्रत्यक्ष दाखविलेल्या कागदपत्रांचा अभ्यास करून मी हे चरित्र साकारले आहे. पंढरपूर येथे गेल्यावर माझ्या अंतरमनाला बुवांच्या समाधीच्या सान्निध्यात आणि त्यांच्या घराच्या परिसरात जे कथा प्रसंग भावले ते मी तसेच अक्षरांकित करण्याचा प्रयत्न केला आहे. या चरित्रातील भक्तीचा धागा कायम ठेवून हे चरित्र लिहिण्याचे कार्य केले आहे. यामध्ये उचित किती, ऐतिहासिक सत्य किती हे जाणकार ठरवितील पण मला मात्र यातील भक्तीची आर्द्रताच फक्त अनुभवाला आल्याने माझे लेखन कदाचित भक्तीप्रधान वाटेल. पण त्याबद्दल असे म्हणावेसे वाटते की लोकांनी न्यून ते पुरते करून घ्यावे.

या कामी पंढरपूर येथील सर्व बडवे मंडळी आणि पत्रकार श्री. विद्याधर ताठे या सर्वांचे ऋण मान्य करून माझे हे वाक्कथन संपवितो.

**स. कृ. देवधर**

**१२, अद्वैत,**
**कृतार्थ सोसायटी,**
**स्वामी स्वरूपानंद पथ**
**(पुणे सातारा रस्ता)**
**पुणे ४११ ०३७**

**पापमोचनी एकादशी शके १९१४**
**गुरुवार दि. १८-३-१९९३**



## ॥ प्रशस्ती ॥

**बाबासाहेब पुरंदरे**
पुरंदरे वाडा, पर्वती,
पुणे ४११ ००९

सतराव्या शतकात विधात्याने महाराष्ट्राच्या भुमीवर विविध सुगंधी फुलांची जणू वृष्टीच केली. अध्यात्म, साहित्य, शौर्य, राजकारण, राज्यकारभार, आरमार-विद्या, समाज नेतृत्व, वास्तुशास्त्र, राष्ट्रवाद, क्रांतीकारी युद्धपद्धती आणि राष्ट्रउभारणीचे अचूक ज्ञान महाराष्ट्राला देणारी अलौकिक बुद्धीमत्तेची आणि कर्तृत्वाची अनेक माणसे महाराष्ट्राच्या भुमीत याच शतकात विधात्याने जणू योजनापर्वूक पाठविली. त्यातून अलौकिक असा दैदिप्यमान इतिहास घडला. श्रीशिवछत्रपती, श्री तुकाराम, श्री रामदास, गागाभट्ट, जिजाऊसाहेब, कवींद्र परमानंद, सेनापती हंबीरराव व नेताजी, संकर्ण सकळ कले, हिरोजी इंदलकर, रावजी सोमनाथ आणि असेच कितीतरी असामान्य कर्तृत्वाचे स्त्री-पुरुष याच शिवकालात आपल्या कर्तबगारीने गाजले. हिंदवी स्वराज्य त्यांनी सजवलं आणि गाजवलं. याच मालिकेत चंद्रभागेच्या तीरावर पांडुरंगाच्या पंढरीत एक महान विठ्ठलभक्त जन्माला आला. महाराष्ट्रधर्माचा आणि संस्कृतीचा हा थोर पुजारी ठरला. शके १५४२च्या श्रावण शुद्ध पंचमीस या थोर वैष्णवाचा जन्म झाला. या वैष्णवाचे नाव होते

**प्रल्हाद शिवाजी बडवे !**

इसवी सनाचे हे १६ वे शतक यावनी सुलतानांच्या भयानक हल्लकल्लोळातच सुरू झाले. आदिलशाही, निजामशाही, मोगलशाही आणि हबशी - पोर्तुगीजांची बेबंदशाही अवघ्या महाराष्ट्रात रक्तपात करत होती. अत्याचार, जाळपोळ, कत्तलबाजी आणि धर्म संस्कृतीचा विध्वंस करत होती. सकल पृथ्वी आंदोलली होती. धर्म बुडाला होता. दिल्लीचा मोगल सुलतान जहांगीर महाराष्ट्रावर धाडीमागून धाडी घालत होता. आदिलशाही, निजामशाही आणि हबशी सत्ताधीश आपली सत्ता टिकविण्यासाठी एकमेकांशी

झुंजत होते. या लांडगे झुंजीत मरत होते मराठे आणि चिरडले जात होते मराठ्यांचे संसार. अशा भयानक काळात मायेचा आधार केवळ लाभत होता वारकऱ्यांच्या आणि संतांच्या कीर्तनातून, भजनातून आणि इश्वर नामाच्या गजरातून. सुलतानांच्या धाडी आल्या की त्यांची पहिली झडप पडायची मंदिरांवर. मराठ्यांची तीर्थक्षेत्रे हे तर त्यांचे मोठेच लक्ष्य! पंढरीचा पांडुरंग हा या सुलतानांना वैरीच वाटायचा. प्राणांपेक्षा प्रिय असलेला पांडुरंग सुरक्षित सांभाळण्यासाठी आटापिटा चालायचा पंढरपूरातील भक्तांचा आणि बडवे मंडळींचा! अन् मग या वैष्णववीरांच्या आघाडीवर असायचे **प्रल्हाद शिवाजी बडवे.**

प्रल्हाद शिवाजी बडवे हे संसारी होते. संसारात असूनही ते विरक्त संत होते. असं वाटतं कि पैठणच्या संसारी एकनाथांचा वारसा घेऊनच प्रल्हाद महाराज बडवे पंढरीत जन्माला आले होते. धर्मरक्षण करणाऱ्या एकनाथांच्या 'जागल्याची' कामगिरी प्रल्हाद महाराज पंढरीत करीत होते. अफजलखानाची स्वारी विजापूरहून हिंदवी स्वराज्यावर निघाली अन् दूर तुळजापूर, माणकेश्वर वगैरे देवस्थाने उध्वस्त करीत अफजलखान पंढरपूरावर आला, तेव्हा या आक्रमकांना चाहूलही लागू न देता प्रल्हाद महाराजांनी श्री पांडुरंगाची मूर्ती आपल्या स्वतःच्या घरातील तळघरात नेवून ठेवली. खानाला पांडुरंग हवा होता. तो फोडून तोडून त्याला महाराष्ट्राच्या आणि महाराजांच्या हृदयाचे तुकडेच करावयाचे होते. परंतु प्रल्हाद महाराजांच्या रूपानं पंढरपुरात सावधान असलेल्या या 'जागल्याने' या 'हृदया'चे रक्षण केले. शिवाजी महाराजांचे संकट प्रसंगी रक्षण करणारे तानाजी, येसाजी, बाजी हे जेवढ्या महत्त्वाचे महाराष्ट्रवीर ठरतात तेवढेच प्रल्हाद महाराज हेही महाराष्ट्रवीर ठरतात.

प्रल्हाद महाराज बडवे यांचे रहाते घर श्री पांडुरंगाच्या मंदिराशेजारीच दक्षिणेस होते आणि आहे. ज्या तळघरात संकटसमयी श्री पांडुरंगाची मूर्ती ठेवली जात असे ते याच घरातील तळघर अजूनही अस्तित्वात आहे. आजही या तळघरात आपण गेलो तर आपल्या अंतःचक्षूंना श्री पांडुरंगाची जपणूक आणि आराधना करणारे प्रल्हाद महाराज दिसतील. वैष्णववीरांच्या पराक्रमाची महाराष्ट्रात आणि पंढरीत स्मृतीचिन्हे आहेत. त्यातील हे तळघर आणि प्रल्हाद महाराजांची वास्तू दर्शनीय आहे. अविस्मरणीय आहे !

छत्रपती शिवाजी महाराजांच्या निर्वाणानंतर दिल्लीचा महाभयंकर सुलतान औरंगजेब महाराष्ट्रावर चालून आला. धर्म, संस्कृती आणि स्वराज्य पूर्णपणे

चिरडून भरडून टाकण्याची त्याची महत्त्वाकांक्षा होती. त्याने महाराष्ट्रात भयंकर उच्छेद सुरू केला. तो पंढरपूरावरही आला. त्याला पंढरपूरचे महत्त्व आणि महात्म्य रायगडाइतकेच मोठे पण असह्य वाटत होते. रायगडाला त्याच्या सरदाराने झुल्फीकार खानाने विळखा घातला. स्वतः औरंगजेब पंढरपुरास आला त्याही वेळी श्री पांडुरंगाची मूर्ती प्रल्हाद महाराजांनी मंदिरातून काढून देगाव येथे पाटलांच्या वास्तूत सुपूर्त केली. रायगडाच्या सिंहासनाचा आणि आणि राजघराण्यातील मंडळींचा बचाव करणे गडकऱ्यांना अशक्य झाले, ते गुलामगिरीत पडले; पण पंढरपूरचा आणि महाराष्ट्राचा हृदयसम्राट श्री विठ्ठल मात्र या वैष्णववीरांनी सुखरूप सांभाळला. यावंच्चंद्र दिवाकरौ महाराष्ट्र प्रल्हाद महाराजांना आणि त्यांच्या विठ्ठलभक्त सहकाऱ्यांना विसरणार नाही. अखंड कृतज्ञ राहील.

आणखीन एका गोष्टीकडे माझे लक्ष जाते. श्री विठ्ठलाची मूर्ती औरंगजेबाच्या हाती लागली नाही याचा संताप आणि असूरी वखवखऔरंगजेबाच्या मनात धगधगत राहिलीच. म्हणूनच केवळ सूड म्हणून मूर्ती नसलेल्या श्री विठ्ठलमंदिरात औरंगजेबानने गाईंची कत्तल केली. मंदीर भ्रष्ट करून टाकले. हे त्याचे कृत्य किती भयानक होते याची कल्पना हिंदू मनालाच येईल. त्याही वेळी ती येत होती. एकदा इतक्या भयंकर रितीने भ्रष्ट झालेले मंदीर कायमचेच सोडून देऊन श्री विठ्ठलाची पुन्हा प्राणप्रतिष्ठा अन्यत्र कुठे करावी हाच विचार परमविठ्ठलभक्तांच्या मनात आला असता. पण प्रल्हाद महाराजांनी तो विचार जनमानसात उमटायच्या आतच ती मूर्ती मूळच्याच जागी शेकडो वर्षांची परंपरा असलेल्या त्याच मंदिरात पुन्हा आणून स्थापन केली. ही मी क्रांतीकारक घटना समजतो. पांडुरंगाच्या चरणावरील तुळशीपत्र हे जिथे पडते ते स्थान निमिषार्धात वैकुंठाइतके पवित्र होते. मग प्रत्यक्ष पांडुरंगाच्या मंदिरात पांडुरंगाचीच स्थापना झाल्यानंतर अपवित्र असे उरतेच काय? म्हणून क्रांतीकारक विचाराच्या महावैष्णवाला दंडवत घालावेसे वाटते.

औरंगजेबाच्या मृत्यूनंतर आक्रमण आणि आक्रमक संपले. टाळ-मृदुंगाच्या निनादात श्री आपल्या सिंहासनावर आरूढ झाले. छत्रपतींची सत्ता साताऱ्यास चिरस्थायी झाली. ध्वजपताका गडकोटांवर व देऊळा-राऊळांवर निर्धास्त फडफडू लागल्या. हरिनाम गजरात अवघी पंढरी दुमदुमली. पुन्हा एकदा आषाढी-कार्तिकीस चंद्रभागा गहिवरून वाहू लागली. वैष्णववीरांना

नाचायला वाळवंट अपुरे पडू लागले. सोळा सोहळ्यात श्रींची पूजा मंदिरात होऊ लागली. आनंदाचे डोही आनंदच तरंगू लागला. महाराष्ट्रांच्या छत्रपतींची सत्तावीस वर्षे विजनवासात जाऊन पडलेली पुण्यशील राजमाता येसूबाई पालखीत बसून पुन्हा राजधानीत प्रवेशल्या. ऐहिक जीवनात आता आणखी कोणाचा आनंदमय सोहळा पहायचे उरले होते? म्हणूनच कि काय प्रल्हाद महाराज बडवे यांनी शके १६४० माघ वद्य एकादशीच्या पवित्र दिवशी श्री विठ्ठल चरणी आपला देह ठेविला. त्यावेळी त्यांचे वय ९७ वर्षांचे होते. आपलया या प्रदीर्घ आयुष्यात श्री विठ्ठलाची राखण आणि वारकरी धर्माचा पहारा करून प्रल्हाद महाराजांनी आपल्या हातीचा वीणा आपल्या सुपुत्रांच्या आणि वारकऱ्यांच्या हाती देवून त्यांनी पंढरीचा आणि जगाचा शेवटचा निरोप घेतला.

शिवचरित्रावर आधारित मी 'जाणता राजा' हे भव्य समूहनाट्य लिहिले. त्याचे प्रयोग चालूच आहेत. या नाटकात अफझलस्वारीच्या वेळी श्री पांडुरंगाची मूर्ती प्रल्हाद महाराज बडवे यांनी मंदिरातून काढली आणि खानाच्या तडाख्यातून वाचविली. हा प्रसंग 'जाणता राजा'त घातला आहे. विशेष म्हणजे याच प्रसंगात प्रल्हाद महाराजांचे प्रत्यक्ष वंशज अनिलराव बडवे यांनीच स्वतः ती भूमिका करून याच पंढरपूरात रंगभूमीवर सादर केली. केवढा हा योगायोग!

महाराष्ट्राच्या सांस्कृतिक इतिहासात प्रल्हाद महाराजांचे स्थान अत्युच्च आहे. आज 'अमृतगाथा' प्रसिद्ध होत आहे. प्रल्हाद महाराजांच्या पवित्र समाधीवरजणू तुळशीहारच वाहिला जात आहे याचा मनापासून आनंद होतो.

**वहुत काय लिहिणे ? सादर साष्टांग दंडवत !**

राजते लेखनावधिः ॥

विश्रामबागवाडा, पुणे
महाशिवरात्र शके १९१४

बाबासाहेब पुरंदरे

## पुरस्कार

# साक्षात्कारी संत प्रल्हाद महाराज

पंढरीक्षेत्रात बडव्यांच्या कुलात जन्म पावलेले श्री प्रल्हादमहाराज हे थोर संत होते. ते श्रेष्ठ भक्त तसेच श्रेष्ठ पंडितही होते. संस्कृतभाषेवर त्यांचे प्रभुत्व होते. ज्ञानदेवांच्या अनुभवामृत ग्रंथाचा त्यांनी अनुष्टुप वृत्तातील श्लोकात सरस अनुवाद केला. त्यांचे ठायी त्यांनी अनुपम प्रिति व निष्ठा होती. 'अनुभवामृत' ग्रंथ दिसायला छोटा असला तरी त्याचा अर्थ अगाध आहे. या ग्रंथाचे तोडीचा ग्रंथ प्राकृतातही नाही व संस्कृत भाषेतही नाही असे त्यांनी वर्णन केलेले आहे.

**दिसे ग्रंथ थोडा परी अर्थ थोडा**
**नसे, - प्राकृती संस्कृती यासी जोडा ॥**

काशीचे एक संस्कृत विद्येचे पंडित पंढरपूरी आले. त्यांना मराठी भाषा समजतच नव्हती पण अनुभवामृत समजून घेण्याची उत्कट इच्छा होती. त्यांचे विनंतीवरून श्री प्रल्हाद महाराजांनी हा संस्कृत अनुवाद केला. श्री प्रल्हाद महाराजांचा ज्ञानेश्वरीवर अत्यंत प्रेमादर होता. ज्ञानेश्वरीच्या काही ओव्या त्यांनी श्लोकबद्ध केल्याचे आढळते. उदा. 'जाले नि जगे मी झाके' इत्यादिकांचे त्यांनी श्लोकबद्ध अनुवाद केला.

**जाले जगे मी जरि जाण झाके ।**
**जगत्वभावे तरि कोण फाके ॥**
**रत्नप्रभे रत्नचि लोपताहे ।**
**किंवा विशेषेवरि शोभताहे ॥**

प्रल्हाद महाराजांच्या संग्रहात ज्ञानेश्वरीची हस्तलिखित प्रत आहे. गीर्वाणभाषेतील भक्तिशास्त्रावरील उपलब्ध निराळी हस्तलिखितेही त्यात होती. त्यापैकी श्री एकनाथ महाराजांचे वशज 'अनंतदेव' या महापंडितांच्या 'भक्तिनिर्णय' या ग्रंथाचे हस्तलिखित आमचे पहाण्यात होते.

श्री प्रल्हाद महाराज हे श्रेष्ठ पंडित त्याप्रमाणे श्रेष्ठ कवीही होते. भक्तिरसाने ओथंबलेली त्यांची अनेक पदे, श्लोक वगैरे हृदयास पाझर फोडणारे आहेत. महाराज उत्तम कीर्तनकारही होते. पण या सर्वाहून ते 'साक्षात्कारी संत' होते. श्री पांडुरंगरायाशी एकांती प्रेमळ संवाद करणारे महापुरुष होते.

प्रल्हाद महाराजांच्या काळी एक महान् संकट पंढरी नगरीचे समीप उपस्थित झाले होते. समर्थ रामदासांनी ज्याच्या संबंधी 'बुडाला औरंग्यापापी । म्लेंछ संहार जाहला । मोडली मांडली क्षेत्रे । आनंद वनभुवनी।।'' असे उद्गार काढले तो क्रूरकर्मा औरंगजेब पंढरीपासून वीस मैलांवर ब्रह्मपुरीस येऊन तळ ठोकून बसला होता. पंढरीच्या देवालयास धोका उत्पन्न झाला. महाराज हे बडव्यांचे पुढारीच होते. त्यावेळी त्यांनी अत्यंत समयसूचकतेने व हुशारीने पांडुरंगाच्या मूर्तीचे रक्षण काही काळ आपल्या घरी तर काही काळ मौजे देगाव इथे गुप्तरूपाने ठेवून केले.

प्रल्हाद महाराजांचे नातू अनंत यांनी एका पद्यात आपली प्रल्हाद महाराजांबद्दलची अनन्य प्रीती प्रगट केली.

प्रेमे जिव्हे करूनी नाम त्याचे गाऊ रे।

नयनद्वारे त्याचेच रूप पाहू रे।

कर्णावाटे तद्गुण हृदयी घेऊ रे।

तत्पदतीर्थे सर्वांगी शीतल होऊ रे।

वाटे कल्पतरुवरी केली आम्ही नीदे रे।।

प्रल्हाद महाराज हे प्रचंड कल्पतरुचे जणु वटवृक्षच होते व त्यावर आम्ही आपली घरटी केली असे अनंत महाराज सांगतात.

प्रल्हाद महाराजांची कविताही बरीच असून त्यातील काही त्रोटक पुस्तिका रूपाने प्रकाशित झाली, परंतु त्यांचा समग्र संग्रह पुस्तक रूपाने प्रसिद्ध करणे अत्यावश्यक आहे.

प्रल्हाद महाराजांची स्फुटपदे रसाळ प्रासादिक आहेत. उदा.

घडि घडि घे हरिनाम।।ध्रु।।

साधन हे जरि करिशी निरंतर। होसी स्वये सुखधाम।।

निर्लज्ज होउनि रंग शिळेवरी। नृत्य करी जितकाम।।

प्रल्हाद प्रभु भजनाविण वृथा। जाऊ नेदि क्षण याम।।

प्रल्हाद महाराजांनी रचिलेली श्रीपांडुरंगाची आरती ही आजही नित्य मंदिरात म्हटली जाते.

शरणागत तव चरणा मजवरि करि करुणा।

अशरण शरणा देई मज निजपदि चरणा।...

जयदेव जयदेव विठ्ठल गुरुनाथा।

त्वत्पद पंकज युग्मी विलसो मम माथा।।

या आरतीत गांभीर्य, कारुण्य, अनन्यभाव यांचा मधूर संगम झालेला आहे.

असो श्री प्रल्हाद महाराजांचे चरित्राचे संपूर्ण असे पुस्तक अद्याप प्रसिद्ध झाले नव्हते. काही स्फुट लेखांतून त्रोटक माहिती आली होती. त्यामुळे त्यांचे चरित्र बहुजन समाजास व वाङ्मयाभ्यासकांना जवळजवळ अज्ञातच होते. प्रस्तुत चरित्र उपलब्ध सर्व माहिती जमवून सुप्रसिद्ध लेखक श्री. स. कृ. देवधर यांनी तयार केले आहे. त्यामुळे प्रल्हाद महाराजांचे थोर संतत्व, कर्तृत्व, भक्तिप्रेमाची शिकवण इत्यादीकांचा वाचकांना परिचय होऊन त्यांना श्रेष्ठ आनंदाचा लाभ होईल. संतचरित्र कथेची पावनगंगा सर्व आबालवृद्ध, स्त्री-पुरुष, ज्ञानी-अज्ञानी यांना पावन करणारी आहे. या गंगेत सर्वांनी सुस्नात होऊन आपले जीवन भक्तिरसाने भरून टाकावे. या चरित्राचे माननीय लेखक स. कृ. देवधर आणि प्रकाशक श्री विद्याधर ताठे हे अभिनंदनास पात्र आहेत.

**श्रीक्षेत्र पंढरपूर** **डॉ. भा. पं. बहिरट**

(एम.ए;डी.लिट्)

## पुरस्कार – २

# सर्वार्थाने कर्तबगार तत्वचिंतक

**डॉ. सदानंद मोरे**

प्रल्हादबाबा बडवे हे वारकरी संप्रदायातले एक थोर आणि अधिकारी सत्पुरुष होऊन गेले. दुर्दैवाने त्यांच्या कामगिरीची जेवढी माहिती सर्वसामान्य लोकांपर्यंत पोहोचणे आवश्यक होती तेवढी पोहचलेली नाही ही स्थिती वारकऱ्यांच्या दृष्टीने फारशी चांगली आहे असे म्हणता येणार नाही. तथापि ही कोंडी फुटण्याचा योग आमचे पत्रकार मित्र विद्याधर ताठे यांच्या ओंकार प्रकाशनाच्या श्री. स. कृ. देवधर लिखित 'अमृतगाथा' या ग्रंथाने येत आहे ही आनंदाची बाब आहे.

प्रल्हादबोवा बडवे हे सर्वार्थाने कर्तबगार होते. अफजलखानाच्या स्वारीच्या वेळी त्यांनी श्री विठ्ठलाच्या मुर्तीचे युक्तिप्रयुक्तीने रक्षण करून सर्व महाराष्ट्रावर उपकार करून ठेवलेले आहेत.

परंतु प्रल्हादबाबा हे अव्वल दर्जाचे अभ्यासक आणि तत्वचिंतकही होते ही गोष्ट पुष्कळांना माहित नाही. ते उत्तम संस्कृतज्ञ होते. ज्ञानेश्वर माउलींच्या अनुभवामृताची महती ऐकून त्यात काय म्हटले आहे ते आपणास कळावे अशी इच्छा एका पंडिताला झाली, परंतु त्याला मराठी येत नव्हते तेव्हा त्याच्या विनंतीवरून बोवांनी अनुभवामृताचा संस्कृत अनुवाद सिद्ध केला. वारकरी संप्रदायात निर्माण झालेली ही एकमेव संस्कृत कृती.

संस्कृत ग्रंथामधील ज्ञान-विशेषतः शास्त्रीय ज्ञान मराठीत आणावे अशी प्रल्हादबोवांची तीव्र इच्छा असे. त्यासाठी त्यांनी जातीने प्रयत्नही केले. प्रमाणलक्षण या त्यांनी मराठीतून लिहिलेल्या ग्रंथात प्रत्यक्ष अनुमान, उपमान आणि शब्द यांचे स्पष्टीकरण केलेले आहे इतकेच नव्हेतर अनुमान प्रमाणाची पंचावयवी सांगून तिची सविस्तर चर्चाही केलेली आहे. पद्मपुराणाच्या आधारे त्यांनी पांडुरंगमाहात्म्य लिहिले ते फारच रसाळ आहे.

देहूकर घराण्याच्या दृष्टीने पाहिले तर प्रल्हादबाबांची कामगिरी उपकारकच ठरते. तुकाराम महाराजांचे कनिष्ठ चिरंजीव नारायणबाबांशी त्यांचे फार जिव्हाळ्याचे संबंध होते. ब्राह्मणांकरवी घर लुटून नारायणबाबा तपतीर्थाटन करीत पंढरीस आले असता अचानक आजारी पडले. प्रल्हादबाबांनी त्यांना आपल्या घरी नेऊन त्यांची शुश्रुषा केली. त्यांच्या यात्रेची सांगता पंढरपुरात मावंदे घालून करविली याच नारायण महाराजांनी पुढे ज्ञानेश्वर महाराज आणि तुकाराम महाराज यांची संयुक्त पालखी काढण्याची प्रथा सुरू केली देहू देवस्थान नावारुपास आणते.

प्रस्तुत पुस्तक हे प्रल्हादबाबांचे आपणांवरील ऋण अंशतः फेडण्याचा प्रयत्न म्हणायला हरकत नाही. श्री या उपक्रमाबद्दल लेखक स. कृ. देवधर आणि प्रकाशक विद्याधर ताठे यांना मनःपूर्वक धन्यवाद देतो.

**डॉ. सदानंद मोरे - देहूकर**

(एम.ए.पीएच.डी.)

तत्त्वज्ञान विभाग, पुणे विद्यापीठ, पुणे ७

# कुळींची कुळकथा

पुराणकाळात पुंडलिकाने मातापित्यांच्या सेवेमुळे निर्माण झालेल्या पुण्याईने पांडुरंगाला विटेवर उभे केले तेव्हापासून पंढरपूरला तीर्थाचे वैभव प्राप्त झाले. पुराण काळापासून या तीर्थाची कीर्ति चंदनाच्या सुवासाप्रमाणे भारतवर्षात दरवळत आहे. पांडुरंगाच्या दर्शनाला हजारो लोक येत. पांडुरंगाचे सखे पांडुरंगाजवळ आपली अनुभवगाथा किंवा दुःखावेग सांगत. पांडुरंग शांतपणे ऐकून घेत. बरेच दिवस देवांचा विरह झाल्याने देवी रुक्मिणी अस्वस्थ झाली. याच अवस्थेत नारदांची भेट झाली. नारद त्रैलोक्यात विहरत असत. रुक्मिणीने त्यांना देव कुठे आहेत आणि काय करीत आहेत असा प्रश्न केला तेव्हा नारद म्हणाले, 'काय सांगू देवी! देवांचे हाय बघवत नाहीत. तो पुंडलिक दुनियेचा मूर्ख. घरात अमृताचा भरलेला कलश असून सुद्धा अमृताच्या प्राप्तीसाठी तो गावोगावी हिंडत होता. त्याला एका ऋषीने चांगले मार्गदर्शन केले आणि आईबाप म्हणजे अमृतकलश आणि त्यांची सेवा हे अमृत आहे असे सांगितले. ऋषींचे हे अनुभवाचे बोल त्याला रुचले. तो घरी आला आणि आई-वडिलांची पाय सेवा करून लागला. त्याची सेवा पाहून देव खूष झाले आणि अगदी अनाहूतपणे त्याच्या भेटीस गेले. त्या पुंडलिकाने प्रथम त्यांच्याकडे मुळीच लक्ष दिले नाही. अतिथीचा अपमान नको म्हणून जवळ पडलेली एक वीट देवांकडे भिरकावून तो म्हणाला, 'या विटेवर जरा विश्रांती घ्या. सध्या मी माझ्या आई-वडिलांची सेवा करीत आहे. ते संतुष्ट झाले म्हणजे मला थांबायची आज्ञा देतील. मग येतोच मी तुमच्या सेवेला!' देव त्या विटेवर उभे राहिले आणि कटिवर हात ठेवून पुंडलिकाची सेवा कधी संपते त्याची वाट पाहू लागले. देवी तुम्हाला सांगू, अजून ते तसेच उभे आहेत. देव त्या ठिकाणी आल्याचे कळल्यापासून देवांची जवळीक साधण्याच्या निमित्ताने देवांचे भक्तही त्या ठिकाणी येऊ लागले. त्यांच्याशी बोलण्यात त्यांचा वेळ जातो. जेवायला फुरसत नाही आणि त्या भक्तांच्या सहवासात भुकेची आठवण नाही. काय करणार?

रुक्मिणीने नारदांचे भाषण ऐकले आणि ती पंढरपूरला आली. देवांना

तिला पहायला वेळ नव्हता तर बोलायला कुठला? तिने खूप वाट पाहिली पण काही उपयोग झाला नाही. अखेर देवी रुक्मिणी पांडुरंगाच्या मागं जावून विसावल्या. आजपर्यंत पांडुरंगाला देवींजवळ बोलायला सवड झाली नाही. तेव्हापासून या कृपावंतांकडे भक्तांचा लोंढा येत आहे. आजही त्यात कमी नाही. देवांची स्तुती करावी आणि देवांचा कृपाकटाक्षाचे धनी व्हावे ही प्रथा अद्यापही तशीच चालू आहे. पंढरपूर तसं लहानसं पण अनेक प्रांतातून अनेक भक्त आले आणि पंढरीशी त्यांनी नागराचं नातं जोडलं. नामदेव, चोखामेळा, कान्होपात्रा, नरहरी सोनार ही मंडळी पंढरपुरात आली आणि तेथेच स्थिरावली. बडवे ही मंडळी देखिल अशीच स्थिरावलेली.

या बडवे कुळात अनंतराव बडवे नावाचे एक सज्जन गृहस्थ होते. वेदोक्त कर्मबद्ध असा त्यांचा गृहस्थाश्रम चालू होता. हे शुक्ल यजुर्वेदाच्या काण्व शाखेचे त्रिप्रवरयुक्त काश्यप गोत्री ब्राह्मण होते. गृहस्थ सज्जन असल्याने पांडुरंगाच्या दर्शनासाठी परप्रांतातून आलेल्या भक्तांचा सत्कार त्यांच्या घरी नेहमी होत असे. वेदाध्यायी अगर वेदपारंगत ब्राह्मण गावात आला तर त्याचे आतिथ्य करण्यात अनंतराव धन्यता मानीत असत. कृष्णाची उपासना हा त्यांच्या वडिलोपार्जित वारसा होता त्यांना एक पुत्र होता. वडिलांच्याप्रमाणे तो देखील शास्त्रपारंगत होता. मुलगा मोठा झाल्यावर एका कुलीन स्त्रीबरोबर शिवाजीचा विवाह झाला. पौत्रमुखदर्शनाची बरेच दिवस प्रतीक्षा केल्यावरसुद्धा आपली इच्छा तशीच मागे ठेवून अनंतरावांनी देह ठेवला. स्वाभाविकपणे शिवाजीवर सर्व प्रपंचाचा भार येऊन पडला. परमेश्वरावरच्या डोळस श्रद्धेने त्यांना धीर दिला. त्याचप्रमाणे त्यांची पत्नी पार्वतीबाई यांनीही संसारी जीवनातील आपल्या वाटेचे ओझे सांभाळले. आपणांस अपत्य होत नाही म्हणून काही काळ ते चिंताशून्य होते. परमेश्वर करतो तेच भले असते असा दृढ निश्चय असल्याने परमेश्वरावर भार टाकून ते निवांत होते. परंतु परमेश्वराच्या जीवरहाटीप्रमाणे ज्यावेळी त्यांच्या आयुष्याचा सूर्य मावळतीकडे झुकला तेव्हा मात्र त्यांना पुत्रप्राप्तीची तळमळ निर्माण झाली. या उद्देशाने या दांपत्याने परमेश्वराला मात्र कधी साकडे घातले नाही. परंतु पत्नी पार्वतीला मात्र नेहमी वाटे की आपल्याला मिळालेला उपासनेचा वारसा यापुढे चालू ठेवण्यासाठी पंढरीनाथांनीच आपणावर कृपा करावी. पण त्यासाठी त्यांनी कधी हट्ट मात्र केला नाही.

एके दिवशी शिवाजीपंत पांडुरंगाची पूजा करण्यासाठी मंदिरात गेले होते; तर पार्वतीबाई देवापुढे बसून नामस्मरण करीत होत्या. त्या पांडुरंगाला

म्हणाल्या, देवा तू तर विश्वाची आई आहेस. बाळाला भूक लागली तर न सांगता सुद्धा तू बाळाकडे धावत येतोस आणि त्याच्या उमललेल्या कोवळ्या ओठात आपला प्रेमपान्हा सोडतोस. बाळाची भूक बाळाला नसली कळत तरी आईला मात्र अगदी तीव्रतेने जाणवते. तुला विश्वाची आई म्हणतात. मला पण वाटतं की आपल्याला सुद्धा कोणीतरी आई म्हणून हाकारावे. पण माझ्या ते भाग्यातच नाही. अंतरीची ही व्यथा मी तुला नको सांगू तर कोणाला सांगू आणि सांगून तरी ऐकणार कोण? अशा विचारात किती काळ गेला ते समजलेच नाही. शिवाजीराव पूजा उरकून घरी आले आणि त्यांनी 'अहो' म्हणून हाक मारली तेव्हा पार्वतीदेवी भानावर आल्या. लगबगीने त्या उठल्या. त्यांच्या मुखावरचे आर्त भाव पाहून शिवाजीराव म्हणाले, कसली काळजी करीत होता. चेहरा अगदी म्लान दिसतोय.

नाही हो! आपल्याला यावयास वेळ लागला म्हणून ज़रा काळजी वाटली. नैवेद्याला वेळ झाला. प्रभु भुकावले असतील असे वाटले.

तुझं आपलं काहीतरीच. आत्ताच सूर्यनारायण मध्यान्ही आला. वैश्वदेव करतो. प्रभूंना नैवेद्य समर्पण करतो आणि मग जेवायला येतो.

पार्वतीदेवी स्वयंपाकघराकडे वळल्या. शिवाजीरावांनी हातातली उपकरणी देव्हाऱ्यात ठेवली आणि तेही स्वयंपाकघरात गेले. वैश्वदेवाची तयारी झाली होती. त्यांनी वैश्वदेवास प्रारंभ केला आणि पार्वतीदेवींनी नैवेद्य वाढायला घेतला.

वैश्वदेव संपवून काकबली टाकण्यासाठी शिवाजीराव बाहेर आले. काव्य काव म्हणून कावळ्यांना आवाहन करीत त्यांनी काकबळी खाली ठेवला. बाजूला उदक सोडले आणि ते काकबळीकडे पाहात राहिले. एक कावळा आला. काव अशी आरोळी देत त्याने काकबळी उचलला आणि तो निघून गेला. शिवाजीराव त्या मोकळ्या जागेकडे पाहात असता त्यांच्या मनात विचार आला, आपले पितृवर्य या बळीने संतुष्ट होतील. पण आपल्या मागे आपणांस संतुष्ट करणारा कोण आहे? मनात विचार येताच त्यांच्या मनानेच त्यांना उत्तर दिले. तुला संतुष्ट करायला पांडुरंग नाही का? त्याला विचार ना! विचाराच्या तंद्रीत ते घरात आले. जेवायला बसताना पुन्हा त्यांच्या मनात हा विचार डोकावला. तेव्हा त्यांनी मनालाच बजावले. पांडुरंगाला मनोव्यथा कथन करणं काही चुकीचं नाही. त्या सर्वज्ञाजवळ आपण काही मागितलं नाही

म्हणजे झालं. याच विचारात तो दिवस गेला.

दुसऱ्या दिवशी नेहमीप्रमाणे पांडुरंगाला नैवेद्य समर्पण करण्यासाठी शिवाजीराव पांडुरंगाच्या मंदिरात आले. नैवेद्य समर्पण करून ते पांडुरंगाकडे पाहात उभे राहिले आणि मनानेच पांडुरंगाला सांगू लागले, पांडुरंगा, तू जीवंत ठेवशील तोपर्यंत तुला नैवेद्य समर्पण करण्याचं कार्य मी करीन. पण माझ्या पश्चात तुला नैवेद्य समर्पण करणारे हात मला काही कोठे दिसत नाहीत. मर्जी तुझी. ते घरी परतले.

नवरात्र संपले. शेतातली पिके खळ्यातून घरी येऊ लागली होती. पौर्णिमेला नवान्नाचा नैवेद्य भगवंताला समर्पण करून झाला. आश्विनासारख्या निरोगी महिन्यात सर्वत्र आनंद दाटलेला असतो. मनुष्य काय पण पशु पक्षी सुद्धा आनंदात वावरत असतात. या सर्वांचा कळस म्हणजे दिवाळी. चर्तुदशीच्या दिवशी पहाटे स्नानादि नित्य कर्म उरकून शिवाजीराव देवळात आले. त्यांनी भावपूर्ण नेत्रांनी पांडुरंगाकडे पाहिले. त्यांना वाटले पांडुरग आज अगदी आनंदात दिसत आहेत. शिवाजीरावांनी देवाची पूजा केली आणि मिळालेला आनंद घेऊन ते घरी आले. 'दिवाळीचा सण। प्रत्येक आनंदाचा सण।। या उक्तीप्रमाणे शिवाजीरावांना वाटले. वधुवस्त्र धारण केलेली वसुंधरा आनंदानं नटली आहे. त्यांनी पृथ्वीलाच प्रश्न केला असेल? कसला एवढा आनंद, तेव्हा पृथ्वी म्हणाली असेल कसला आनंद म्हणून काय सांगू. अरे माझ्या विठ्ठलाचे भक्त आता त्यांच्या दर्शनाला येतील. त्यांच्या पायाची धूळ लागावी आणि आपलं भाग्य उजळावं म्हणून इतके दिवस मी वाट पाहात होते ते दिवस आता जवळ आले. त्या भक्तांच्या पदस्पर्शाचा आनंद काय असतो म्हणून सांगू? अशा आनंदी वातावरणात पांडुरंग शिवाजीरावांच्या स्वप्नात आले आणि म्हणाले, 'अरे किती चिंता करतोस. मी तुझ्या उपासनेने संतुष्ट झालो आहे. तुला काय हवं ते मागून घे. ते ऐकून शिवाजीराव म्हणाले, भगवंता मला काही नको. जन्मोजन्मी तुझी सेवा घडावी एवढीच माझी इच्छा आहे. शिवाजीरावांनी काही मागितले नाही. पण पांडुरंगाने त्यांना सांगितले, तुला काही नको असले तरी ऐक, तुझी सेवा झाली. परंपरेने तो स्रोत तसाच रहावा अशी माझी इच्छा आहे. एवढे बोलून देव अंतर्धान पावले. इष्ट वराची प्राप्ती झाली असेच याचे स्वरूप होते ते झोपेतून जागे झाले. तो दिवस होता **शके १५४१ (इ.स. १६१९) कार्तिक शुद्ध प्रतिपदा!**

पार्वतीदेवींना पांडुरंगाच्या प्रसादाने दिवस राहिले. शिवाजीरावांना अतिशय आनंद झाला. या काळात साधुसंतांची चरित्रे ऐकावीत. पांडुरंगाच्या मुखाकडे सतत पाहात बसावे, भागवत आणि ज्ञानेश्वरीसारखे ग्रंथ ऐकावेत असे वाटू लागले. पत्नीचे हे डोहाळे पाहून शिवाजीरावांना धन्यता वाटे. आपल्या उदरी खरोखरीच पांडुरंगाची भक्ती करणारा भक्त जन्माला येईल या विचाराच्या आनंदात त्यांचा दिवस केव्हा निघून जाई ते समजत सुद्धा नसे. पार्वतीबाई आणि शिवाजीराव पहाटे ब्राह्ममुहूर्तावर उठत. आपले शौचमुखमार्जनादि क्रिया करीत आणि चंद्रभागेवर स्नानास येत. स्नान करताना शिवाजीराव गंगास्तवन म्हणून गंगेला आळवीत तर पार्वतीदेवी कान देऊन ऐकत, स्नान करीत. पार्वतीदेवीचे स्नान झाले म्हणजे त्या पांडुरंगाच्या मंदिरात येत. सनईच्या मंजूळ स्वरात काकड आरती भक्तगण गात. ती ऐकतांना त्या भान विसरत. पांडुरंगाची आरती झाली की त्या घरी येत. सडा-संमार्जण करीत. मागच्या पुढच्या अंगणात रांगोळी रेखीत, तुळशीजवळ दिवा लावीत आणि तिची मनोभावे पूजा करून म्हणत, देवी तू जशी भगवंतांची आवडती झालीस तसा माझ्या उदरीच्या पुत्राला पण पांडुरंगाचा आवडता कर. प्रार्थना संपली की तुळशीच्या पावन स्पर्शाचे तीर्थ घेऊन त्या घरात येत. तोपर्यंत सूर्याची किरणे घरात प्रवेश करीत. शिवाजीराव स्नान-संध्या, गायत्रीजप संपवून पांडुरंगाच्या दर्शनासाठी मंदिरात येत. पांडुरंगाच्या समोर उभे राहून त्याला डोळेभर पाहात आणि म्हणंत -

**महायोगपीठे तटे भीमरथ्यां ।**<br>
**वरं पुंडरीकाय दातुं मुनिंद्रैः ॥**<br>
**समागत्य तिष्ठन्तमानन्दकन्दम् ।**<br>
**परब्रह्मलिंगं भजे पांडुरंगम् ॥**

प्रत्येक श्लोकावर त्यांचे नेत्र अधिकाधिक आर्द्र होत जात. ते आनंदाने प्रवाहित होत. डोळे पुसण्याचे भानही त्यांना राहात नसे. पांडुरंगाचे दर्शन घेऊन ते घरी येत. तृप्त मनाने भांडे घेऊन गोठ्यात प्रवेश करीत. त्यांचा पदनाद ऐकून गाई आपल्या वासरांना हंबरून सांगत. उठा, माझ्याजवळ या. शिवाजीराव गोठ्यात येत. आईकडे मनाने आणि शरीराने ओढ घेणारे वासराचे दावे सोडीत. बाणातून तीर सुटावा तसे ते वासरू वेगाने गाईकडे धाव घेई आणि शेपटी हालवीत तिच्या स्तनांना झटे. मध्येच ते ढुसणी मारी

तेव्हा गाय तोंड वळवून त्याला चाटी. त्या मायलेकरांचे हे प्रेमाचे उधान बघत असता शिवाजीरावांना धार काढायलाही उशीर होई. त्यामुळे स्वाभाविकच थोडं दूध कमी येई. ते पाहून पार्वतीदेवी विचारत गाईनं आज जरा कमी दूध दिलं वाटतं.

कमी कसलं. शिवाजीराव सांगू लागत. अगं मी वासरू सोडलं आणि ते आईच्या स्तनांना बिलगलं. गाय त्याला प्रेमाने चाटू लागली. लेकराचं ते उघडं प्रेम पाहताना दूध काढायला उशीर झाला. पण बरं कागं, त्या वासराला मात्र भरपूर प्यायला मिळालं. नाहीतर ज्ञानेश्वर माऊली म्हणतात त्याप्रमाणे -

**कां गे दुभतियाचिया आशा । जगचि धेनूसि करित आहे फासा ।**
**दोरेवीण कैसा । वत्साचा बळी ॥** (ज्ञाने. ७-१२०)

असं त्याचं अन्न आणि आनंद हिरावून घेणं बरं नाही वाटत.

पतीच्या शद्बानं हेलावलेलं हृदय सांभाळित पार्वतीदेवींनी पाट मांडला आणि धारोष्ण दूध आणून ठेवीत त्या म्हणाल्या, दूध घ्यावं आणि पूजा करावी. देव तुमची वाट पाहात असतील.

हे रोजचं होत होता होता हिवाळा आला आणि संपला. वसंतानेही जगाचा निरोप घेतला. पंढरपूरची आषाढी वारी आली. पांडुरंगाचे भक्त पंढरीत जमा झाले. हरिनामाच्या गजरात चंद्रभागेचे वाळवंट दुमदुमले तर पंढरीनाथ पुंडलिकाच्या गजराने पंढरी गरजली. चंद्रभागा दुथडी भरून वाहत होती तर भक्तभाविकांच्या प्रेमसागराला अपार भरती आली होती. बडवे म्हणजे पंढरीनाथाचे सेवक पंढरीनाथांच्या सेवकांची सेवा केली तरी पंढरीनाथ प्रसन्न होतो. ज्ञानदेवांचे शद्ब आठवले -

**पैं प्रेमळाची वार्ता । गे अनुवादती पांडुसुता ।**
**तें मानू परमदेवता । आपुली आम्ही ॥** (ज्ञा. १२ : २३८)

आणि शिवाजीरावांचं मन आनंदानं फुलू लागलं. वारकरी दिसला की त्यांना पांडुरंगाचे दर्शन झाल्याचा आनंद व्हायचा. भल्याबुऱ्या विचारांना घेऊन हे वारकरी येत, आपले विचार पांडुरंगाच्या चरणी अर्पण करीत आणि त्याचा प्रसाद घेऊन परत निघत. त्या भक्तांसाठी शिणलेला पांडुरंग पाहिला की शिवाजीराव तळमळत. पण एक-दोन दिवसात पांडुरंगाच्या मुखावरील शिणोटा संपे आणि पुन्हा त्याचं जनजीवन सुरळीत होई. यामध्ये आषाढ केव्हा मागे पडला हे लक्षात सुद्धा आलं नाही.

# कुळदीप प्रज्वळलला

वर्षा ऋतु आता पृथ्वीचा स्वामी झाला होता. त्या पृथ्वीला सस्यश्यामला करण्यासाठी त्यानं जलवर्षाव करायला सुरुवात केली होती. श्रावण महिना चालू झाला. श्रावण म्हणजे धार्मिकांच्या धर्मक्रियांना स्फूर्ति देणारा पवित्र मास.. श्रावणाचे चार दिवस संपले. पंचमी लागली. सकाळी पार्वतीबाईंनी स्नानादि कर्मे केली. गर्भभाराने तिची गती मंदावली होती. शिवाजीराव पूजा संपवून घरी आले तेव्हा पार्वतीबाई त्यांना म्हणाल्या - ऐकलं का? मला जरा बरं वाटत नाही. मी जरा आडवी होते. त्या तेथेच लवंडल्या पण त्यांना चैन पडत नव्हते. शिवाजीरावांनी हे पाहिलं आणि एका वृद्ध सुईणीला बोलावून आणलं. तिनं पाहिलं पार्वतीदेवींचा प्रसूतीकाळ अगदी सन्निध येऊन ठेपला आहे. त्या वृद्धेने पार्वतीदेवींना हात धरून सूतिकेच्या खोलीत नेलं. शिवाजीराव पांडुरंगाच्या मूर्तीसमोर बसून मुक्या मनानं त्याची प्रार्थना करीत होते. काही थोडा वेळ गेला तोच सूतिकेच्या खोलीतून नवजात बालकाने उच्चारलेला कोऽहं ध्वनी ऐकायला आला. ते उठले. तोच त्या वृद्ध सुईणीने पुत्रजन्माची सुखद वार्ता सांगितली. आनंदाने शिवाजीराव चटकन उठले. देवासमोरची सहाण पुढे ओढली. तिच्यावर पळीभर मध आणि थोडे गाईचे तूप टाकले. हातातली अंगठी काढली. चधकन चार वळसे उगाळले. ते सर्व मिश्रण चांदीच्या पळीत घेऊन त्यांनी सुतीकेच्या घरात प्रवेश केला. इवलेसे अवयव हलवणारे उदयोन्मुख गभस्तीप्रमाणे एका गोधडीवर ठेवलेले ते बालक पाहिले. कोऽहं शद्ब उच्चारणाऱ्या बालकाला तू ॐ आहेस असे सांगत त्याच्या इवल्याशा जिभेला ते चाटणण गायत्री मंत्र म्हणत चाटवले. चुटचुट आवाज करीत त्याने ते घेतले. आता त्याचे रडणे थांबले होते.

त्यांनी श्रमलेल्या पत्नीकडे पाहिले, 'बाळ छान आहे नाही! असे म्हटले. तिने मानेनेच होकार दिला आणि दुणावलेल्या आनंदाने ते बाहेर आले. गुडघे टेकून देवांच्या समोर बसत ते म्हणाले, देवा, तुझी लीला अगाध आहे. मनात आले होते उद्या तुला नैवेद्य कोण दाखवणार, पण आपल्या मोठेपणाला धक्का

लागू नये म्हणून तूच भक्तांना जन्माला घालतोस. देवा, हा माझ्या वंशाचा दिवा असला तरी तो तुझा सेवेकरी व्हावा, मोठा भक्त व्हावा म्हणून माझी तुझ्या चरणी प्रार्थना आहे.

शके १५४२ श्रावण शुक्ल ५, नागपंचमी, बुधवार या शुभदिनी पुत्रप्राप्तीच्या आनंदातच दुपारी शिवाजीराव पंढरीनाथाच्या दर्शनाला आले. विटेवरची साजिरी मूर्ती पाहून त्यांचे नेत्र ओलावले. कंठ रुद्ध झाला. तशाच अवस्थेत मनानेच आपला आनंद पांडुरंगाला सांगून उपरण्याने डोळे टिपत ते बाहेर आले. आता त्यांचा कंठ मोकळा झाला. गावातील पंढरीनाथाच्या दर्शनाला आलेल्या आपल्या अनेक मित्रांना त्यांनी ही गोड वार्ता सांगून त्यांच्या हातावर साखर ठेविली. सर्वांना आनंद वाटीत ते स्वतःच आनंदात बुडून गेले. ज्ञानेश्वर महाराजांनी म्हटल्याप्रमाणे -

**सटवीचिये रातीं। न विसंबिजे जेवी वातीं ।**
**तैसा ईश्वरानिर्णयो चित्तीं। वाहणें सदा ॥** (ज्ञाने. १८-८३७)

त्याप्रमाणे पांचवा दिवस उजाडला. बाळाच्या कपाळीं त्याचे जीवनचित्र रेखाटण्यासाठी सटवी येते. तिला लिहावयाला दिसावे म्हणून दिवा लावून त्याची आणि सटवीची पूजा केली. अनेक ब्राह्मणांना शिवाजीरावांनी पाचारण केले होते. त्या सर्वांनी वेदघोष केला. त्यानंतर त्यांनी सटवीचा प्रसाद म्हणून द्रोणभर घुगऱ्यांचा प्रसाद सर्वांना वाटला. सटवीनें त्यांच्या मस्तकी लिहिले असेल की 'हा संस्कृत पंडित होईल पण अहंकारी होणार नाही. प्रभूच्या प्रेमात स्वतःला हरवून बसणारा आणि जगाला निर्दोष ज्ञान प्रदान करणारा पांडुरंगाचा महान सेवक होईल. याची ख्याती सर्वत्र पसरेल.'

दहा दिवसांचे अस्पर्शत्व संपले. सर्व शुचिर्भूत झाले. घर-दार शुद्ध केले. बाराव्या दिवशी नामकरण आणि कर्णवेध असे दोन संस्कार करण्याचे ठरले. शिवाजीरावांनी वैदिक ब्राह्मणांना पाचारण केले. सुहासिनींनाही आमंत्रण दिले. श्रावण वद्य प्रतिपदा रविवार उजाडला. शिवाजीरावांचे मित्र जमा झाले.

(टीप : जन्माच्या वेळीं गर्भ अंधःकारमय गर्भागारातून जगांत येतो. त्याच्या नेत्रांना या प्रकाशाची सवय नसते. ती हळू हळू करावी लागते. म्हणून पहिल्या दिवशी समईची एकच वात लावली जात आहे. रोज एक एक वात वाढवीत पंचमीच्या दिवशी पांच वाती लावल्यावर त्या दीपाची पूजा करावयाची. या हळुवार क्रियेने नवजात बालकाला प्रकाशाची सवय होते. त्याचे डोळे विकृत होत नाहीत. हे प्राचीन भारतीयांचे विज्ञान आहे.)

काहीनी घर सजविले. दाराला तोरणे बांधली. जय-विजयाच्या थाटांत बाहेरच्या दारांत लेकुरवाळ्या केळी उभ्या केल्या. गुढ्या उभारल्या. सडे टाकले. त्यावर रांगोळी आणि घरांत येणाऱ्या बाळप्रभूंची पावले उमटविली. दुपार झाली. ब्राह्मण-सुहासिनींनी घर भरून गेलं. माजघरांत मध्यभागी पाळणा टांगला. त्याला फुलांनी सजविले. आंत दुपट्यांची मऊ मऊ शय्या तयार केली. सारी सिद्धता झाली.

कुलोपाध्याय आले. गणपतीची पूजा झाली. प्रारंभीचे स्वस्तिवाचन झाले. बाळाला बाहेर आणले. सोनाराने त्या बाळाचे कान टोचले. बाळाने ऊं कां चूं केले नाहीं. त्या सोनाराचा सत्कार करण्यात आला. शिवाजीरावांनी अनेक वेळा आपल्या पुत्राचे मुख न्याहाळले. तेव्हां कुलोपाध्याय म्हणाले, शिवाजीराव आचमन करा. ते शब्द ऐकून शिवाजीराव भानावर आले. त्या नवजात अर्भकाला एका सुहासिनीच्या हाती देऊन कुलोपाध्यायांच्या सूचनेप्रमाणे नामकरणाचा संकल्प केला. पूजन झाले. एका ताम्हनांत कुलोपाध्यायांनी तांदूळ पसरले आणि ते शिवाजीरावांना म्हणाले-

हातांतले सुवर्णाचे पवित्रक काढा आणि या तांदूळावर सर्वांत वरतीं लिहा.

ॐ गँ गणपतये नमः।
नमस्कार करा-गणपतिं आवाहयामि।
ॐ कुलदेवतायै नमः।
नमस्कार करा-कुलदेवताम् आवाहयामि।
ॐ मासनाम प्रतिष्ठिताय वासुदेवाय नमः।
नमस्कार करा-वासुदेवं आवाहयामि।
ॐ नाक्षत्रनामं आवाहयामि
ॐ अथ व्यावाहारिक नामम् आवाहयामि।

याप्रमाणे या पाचांची पूजा झाल्यावर तेथील सुहासिनींनी बाळाला बाहेर आणले. डोळ्यात काजळ, गालावर काळी तीट लावून त्याला आत्याच्या हातीं दिला. आत्याबाई पाळण्याजवळ गेल्या. कोणी गोविन्द घ्या. कोणी गोपाळ घ्या. असे म्हणत त्यांनी बाळाला सजवलेल्या पाळण्यात ठेवले. **'प्रल्हाद'** असे त्याच्या कानी सांगून त्यांनी पाळण्याकडे पाठ केली. पाठीने पाळण्याला झोका देत त्या

म्हणाल्या ऐकलं का बाळाच्या कानांत त्याचं नांव सांगितलं.

काय नाव ते तर सांगा.

पाळण्यातील बाळाला कुरवाळण्यासाठीं त्यांनी पुन्हा पाळण्याकडे तोंड केलं आणि बाळाचा मधुर पापा घेत त्या म्हणाल्या **प्रल्हाद** !

वा! वा!! विष्णुभक्त प्रल्हाद.

शिवाजीरावांनी ओटीवर बसलेल्या वैदिकांना वेदघोष करावा म्हणून प्रार्थना केली. वैदिकांनीं वेदघोष करीत अखेर त्या अर्भकाला आशीर्वाद दिले. शिवाजीरावांनीं वैदिकांचा समयोचित सत्कार केला. त्यांना भरपूर दक्षणा प्रदान केली आणि सर्वांना दूध साखर देऊन त्यांची तोंडे गोड केली.

माजघरांत अनेक सुहासिनींनीं बाळाला ओवाळले. बाळवस्त्रे आणि बाळलेणीं अर्पण केली. परमेश्वर प्रेमानें आर्द्र झालेल्या शब्दांनी पाळणा म्हटला. पार्वतीबाईच्या मुखावरून आनंद ओसंडत होता. आलेल्या सुहासिनींची खणा-नारळाने त्यांनी ओटी भरली आणि दूध-साखरेने सर्वांची तोंडे गोड केली.

सर्व वैदिक ब्राह्मणांनी शिवाजीराव व पार्वतीबाई यांना आशीर्वाद देताना म्हटलें

**श्रीर्वचस्वमायुष्यमारोग्यमाविधाशोभमानं महीयते।**
**धान्यं धनं पशुं वहुपुत्रलाभं शतसंवत्सरं दीर्घमायुः।।**

उभयतांच्या मस्तकीं अक्षता टाकून ब्राह्मण आणि त्यांच्या पाठोपाठ सुहासिनी निघून गेल्या. पार्वतीबाई बाळाला झोके देत परमेश्वराला विनवीत होत्या.

घरचा समारंभ संपल्यावर शिवाजीराव पांडुरंगाच्या मंदिरात गेले. मनोभावे पूजा केली आणि ते त्याला म्हणाले -

पांडुरंगा तूंच आमच्यावर कृपा केलीस. पोटी पुत्र दिलास. आज त्याचे नामकरण केले प्रल्हाद तुझा महान भक्त. त्याच्या भक्तीसाठी तुला अवतार धारण करावा लागला. त्या तुझ्या थोर भक्ताचेच नांव मी माझ्या पुत्राला ठेवले. तुझी कृपा असली म्हणजे सर्व चांगले होईल. त्या भक्तासाठी तू अवतार धारण केलास त्याप्रमाणे माझ्या पुत्राला तुझा भक्त होण्याची बुद्धी दे. तूं त्याला आपला म्हटलेस म्हणजे त्यांत सर्वकाही आले.

पांडुरंगाची प्रार्थना करून ते मंदिराच्या बाहेर पडले.

# विद्याजन्म

आता प्रल्हाद मोठा झाला होता. रोज तो आपल्या वडिलांबरोबर पांडुरंगाच्या मंदिरात जाई शिवाजीराव पूजा करीत तेव्हा तो पांडुरंगाच्या मूर्तीकडे टक लावून बघत उभा राही. शिवाजीराव भाविकपणे मंत्रोच्चार करीत पूजोपचार करीत. एकेका उपचाराबरोबर पांडुरंगाचे मुख तेजाळू लागे. या तेजपूर्ण मूर्तीकडे पाहातांना प्रल्हाद स्वतःला विसरून जात असे. पांडुरंगाला लोणी-खडीसाखरेचा नैवेद्य समर्पण करून झाला की शिवाजीराव प्रल्हादाला हाक मारीत आणि म्हणत. बाळ प्रल्हाद हा पांडुरंगाचा प्रसाद तूं खा. वडिलांच्या आज्ञेप्रमाणे तो प्रसाद भक्षण करी. हातानेच तोंड पुशी आणि वडिलांना म्हणे बाबा गोकुळांत असतांना श्रीकृष्ण पण असाच लोणी खात असे नां ! नाही बाळ तो एकटा नव्हता. त्याचे सवंगडी त्याच्या बरोबर असत. प्रथम तो त्यांना आपल्या हातानं लोणी भरवी आणि मग आपण खाई.

किती मजा येत असेल. पण बाबा मला तो प्रसाद तुम्ही दिलात, पण तुम्ही मला तो तुमच्या हाताने भरविलात का नाहीं.

मोठ्यानें हसत शिवाजीराव म्हणाले, अरे लबाडा म्हणजे मी तुला प्रसाद भरवायचा. माझे हात ओंशट झाले तरी चालतील. तुझ्या हाताला काही लागायला नको असंच की नाहीं.

तसं नाही बाबा. तुम्ही पांडुरंगाची पूजा करतां तेंव्हां पांडुरंग तुमच्याकडे बघत असतो. तुमच्या शरीरांतच तो आहे असं मला वाटतं. म्हणून म्हटलं शिवाजीरावांकडे बोट दाखवीत प्रल्हाद म्हणाला, ह्या पांडुरंगाच्या हातानं प्रसाद खावा.

समजलं. समजलं बरं ! आतां उद्यापासून पांडुरंगाचा प्रसाद मी माझ्या हातानं तुला भरवीन. मग तर झालं.

प्रल्हादाला बाबांचं बोलणं आवडलं. तो हंसला आणि थोडा लाजलाही.

पूजेचे रिकामे ताट हाती घेवून शिवाजीराव बाहेर आले. समोर चन्द्रभागा संथपणे वाहात होती. सूर्य चांगला वर आला होता. सूर्याचे किरण चन्द्रभागेच्या पाण्यावर विखुरले होते. त्या पुण्यमयी सरितेला शिवाजीरावांनी नमस्कार केला. प्रल्हानेही त्यांचे अनुकरण केले. दोघेही घरी आले. आईऽऽ म्हणून प्रल्हादाने हाक मारली. पार्वतीबाई पदराला हात पुसत बाहेर आल्या. प्रल्हाद त्यांना बिलगला. पार्वतीबाई म्हणाल्या - झाली का पूजा. दोघानीही अबोलपणे उत्तर दिलें.

प्रल्हादाचे बोलणे आठवून शिवाजीराव पत्नीला म्हणाले, ऐकलं का - आज देवळात एक गंमत झाली. प्रल्हादाला मी प्रसाद दिला तेव्हां लबाड म्हणतो कसा. तुम्हीच भरवा तुमच्या हातांनीं. मी विचारलं तेव्हां तो म्हणाला पांडुरंगाची पूजा करतांना तुमच्या शरीरांत पांडुरंग शिरतो. कृष्ण जसा आपल्या सवंगड्यांना आपल्या हाताने लोणी भरवत होता तसं तुम्ही मला भरवा. प्रल्हादाचे हे शब्द ऐकून मला आश्चर्य वाटले. मनांत विचार आला ज्ञानदेव म्हणतात त्याप्रमाणे तर हा कोणी महात्मा जन्माला नाही ना आला. कारण त्याच्या बालबुद्धीतून बोललेले शब्द पंडितांना देखील भुरळ घालतील. ज्ञानेश्वर महाराज म्हणतात -

**मोटकी देहाकृति उमटे। निज ज्ञानाची पाहाट फुटे।**
**सूर्यापुढे प्रकटे। प्रकाशु जैसा॥**
**तैसी दशेची वाट न पाहता। वयासेचिया गावा न येता।**
**बाळपणीच सर्वज्ञता। वरी तयातें॥**
**मग तिथे सिद्धप्रज्ञेचेनि लाभें। मनाचि सारस्वते दुभे।**
**सकळ शास्त्रें स्वयंभें। निघती मुखें॥ ज्ञाने. ६**

शिवाजीराव पांडुरंगाचे आणि पर्यायानें ज्ञानदेवांचेही महान भक्त होते. त्यामुळे आपल्या पुत्राकडे पाहिल्यावर त्यांना ज्ञानेश्वरांच्या वचनाची आठवण झाली तर नवल नाही मूळच्या पल्लवित ज्ञानावर मोहर उमटविण्यासाठी जनरीतीप्रमाणें प्रल्हादाला गुरुगृही पाठविणे आवश्यक होते. गुरुमुखातून श्रवण केलेली विधा संजीवनी प्रमाण सुखद असते. त्या संजीवनीचा लाभ आपल्या

पुत्राला त्याच्या पुढील आयुष्यांत व्हावा या उद्देशानें शिवाजीराव पत्नीला म्हणाले. प्रल्हादाचें उपनयन करून त्याला गुरुसानिध्य प्राप्त करून देणं अगत्याचं झालं आहे.

अहो पण व्रतबंध आठव्या वर्षी करावा म्हणतात. आत्ता तर प्रल्हादाला सातवेच वर्ष चालू आहे. आठवें लागायला अजून सहा महिने तरी आहेत.

हो तुझं म्हणणं खरं आहे. पण शास्त्र असं सांगतं कीं मुलाला आठव्या वर्षी मुंज लाभत नसेल तर गर्भातले दिवस लक्षांत घेवून आठव्या वर्षी मौंजिबंधन करावे.

आतां शास्त्रच जर असं सांगतं तर करावी म्हणते त्याची मुंज.

मला वाटते चैत्र मासांत त्याच्या मुंजीचा बेत-करू. मी गुरुजींना भेटतों. त्यांनाच विचारतो. म्हणजे ते सगळे स्पष्ट करतील. मनांत कुठलीही शंका येणं चांगल नाही. तिचं निराकरण झालं पाहिजे अन्यथा संशयात्मा विनश्यति।

ठरल्याप्रमाणे चैत्र मास उजाडला. राम नवरात्र संपले. हनुमंताची जन्मपौर्णिमाही मागें पडली. चैत्राच्या वद्य पक्षात प्रल्हादाचा व्रतबंध ठरला. शिवाजीरावांनीं पांडुरंगाला आमंत्रण केले आणि त्यानंतर पंढरपुरांतील वेदज्ञ, पंडित, व्यापारी, शाळेतील शिक्षक आणि अनेक सुहासिनींना आमंत्रित केलें. मोठ्या थाटाने व्रतबंधाचा संस्कार करण्यात आला. शिवाजीरावांनी प्रल्हादाला गायत्रीदीक्षा दिली. या दीक्षेनंतर प्रल्हादाच्या मुखावर महान तेज पसरले. बटुवेशांत त्याने सर्व श्रेष्ठांना वन्दन करून त्यांचे आशीर्वाद धारण केले.

मौंजीबन्धन झाल्यावर प्रल्हादाचा कार्यक्रम अगदी ठरून गेला. सकाळीं लवकर उठावे शरीरशुद्धी, स्नान करून संध्या-गायत्री उपासना करावी. त्यानंतर सूर्याला नमस्कार घालावेत. एवढे झाले म्हणजे आई त्याला गाईचं दूध देई ते तो प्राशन करी. तोपर्यंत शिवाजीराव विठ्ठलाची पूजा करून घरी येत. घरी देव होते, त्यांच्या पूजेला ते बसत तेव्हां प्रल्हाद त्यांना सहाय्य करी. त्यानंतरचा वेळ आईला मदत करण्यात जाई. दुपारची जेवणे झाली की शिवाजीराव त्याला शिकवीत. एकपाठी असल्याप्रमाणे त्याचे अध्ययन चालू होते. अक्षर ओळख, वाचन, तोंडी हिशेब, उजळणी वगैरे शिकून झाल्यावर शिवाजीराव त्याला संस्कृत शिकवीत. प्रारंभी शब्दरूपावली समासचक्र शिकवून झाले.

# बालभक्ती : संतत्वाची नांदी

एकदा काही निमित्तानें शिवाजीराव मंगळवेढ्याला गेले. त्यामुळे पूजादिकांचा भार आपोआप प्रल्हादाकडे आला. पूजेची सर्व तयारी घेवून पांडुरंगाच्या पूजेसाठी प्रल्हाद बाहेर पडणार तोच आई म्हणाली - बाळा, आज की नाही मी देवाच्या नैवेद्याला पेढे केले आहेत. तू पांडुरंगाच्या पूजेला चालला आहेस. नैवेद्याला पेढे घेवून जा. पांडुरंगाला म्हणावं घरी केलेले हे पेढे खाऊन तरी बघ. प्रल्हादाने एका वाटीत पेढे घेतले आणि पूजेसाठी तो पांडुरंगाच्या देवळांत आला. वडील करतात त्याप्रमाणे अगदी मन लावून त्याने पूजा केली. पेढ्यांचा नैवेद्य समर्पण केला आणि हात जोडून पांडुरंगाला म्हणाला, पांडुरंगा, पंढरीनाथा, वडील बाहेरगांवी गेले म्हणून मला तुझ्या पूजेला यावं लागलं. मी तुझ्यासाठी हा पेढ्याचा प्रसाद आणला आहे. तू खावास असे मला वाटते. तू पेढा खाल्लास म्हणजे माझें पोट भरेल. अगदी निरागसपणे प्रल्हाद देवाला विनवीत होता. अखेर पांडुरंगाला प्रल्हादाची दया आली. त्याचा प्रेमभाव पाहून आनंद झाला. तेव्हां पांडुरंगाने खाली वाकून बाळ प्रल्हादाच्या हातून पेढे खाल्ले. प्रल्हादाला अतिशय आनंद झाला. वाटींत तीन पेढे फक्त शिल्लक होते ते पाहून आपण घरीं जाऊन आईला हे वृत्त कधी सांगतो असें झालें होतें. तो देवळांतून जवळ जवळ उड्या मारीतच बाहेर पडला. घरी येवून त्याने आईला सांगितले, आई! आई!! तुझ्या हातचा पेढा पांडुरंगाने अगदी आवडीने खाल्ला. हे ऐकतांना त्या मातेचे डोळे पाण्याने ओसंडत होते.

शिवाजीराव घरी आल्यावर पांडुरंगाने पेढे खाल्ल्याची वार्ता त्यांना कळली. ते एकदम अंतर्मुख झाले. मनांत विचार आला आपला पुत्र म्हणजे गतजन्मीचा कोणीतरी महात्माच असला पाहिजे. गतजन्मातील भक्तिशिदोरी बरोबर घेवूनच हा आमच्या सारख्यांच्या उदरी पुत्ररूपाने आला आहे. नाहीतर पांडुरंगाची एवढी जवळीक इतक्या लहान वयांत कशी साधली असती. लोक

जन्म-जन्म घालवितात. पांडुरंगांची भक्ती करतात पण त्यांच्या भक्तीला पांडुरंग वश होत नाही. ह्या बाळाने त्याला कसा अंकित केला न कळे.

पुन्हा एकदां अशीच अघटित घटना घडली. माघाचा महिना होता. पौर्णिमेच्या कुलधर्मानिमित्ताने सुहासिनी व ब्राह्मण-भोजन घालावे म्हणून पार्वतीबाईंनी अंगणांत हरभऱ्याची डाळ वाळत घातली आणि त्या प्रल्हादाला म्हणाल्या - बाळा तूं इथे बस आणि डाळीची राखण कर. गुंरवासरं येतील. डाळीला तोंड लावतील. जरा बघ. असे सांगून पार्वतीबाई घरांत गेल्या. थोड्या वेळानें तीन-चार गाई आल्या. त्या सोज्वळ गायी पाहून प्रल्हादाला आनंद झाला. त्या येता येता अंगणात आल्या. त्यांनी डाळ खाल्ली पण प्रल्हाद त्यांच्या या क्रियेकडे एकटक पाहात राहिला. अर्धीअधिक डाळ गायींनी खाऊन टाकल्यावर आईच्या हाकेबरोबर प्रल्हाद भानावर आला. त्याने गायींना तेथून दूर हाकून लावले. पार्वतीबाई डाळ नेण्याच्या निमित्ताने घरांतून अंगणात आल्या होत्या. पहातात तो थोडीशीच डाळ तेथे वाळत होती. त्या थोड्या रागावल्या. तेव्हां प्रल्हाद खिन्न होऊन एका बाजूला एखाद्या अपराध्याप्रमाणे उभा राहिला. पार्वतीबाई मनात म्हणाल्या गाईंनी किती डाळ खाल्ली ते तरी पाहावे म्हणून घरांतून त्यांनी एक माप आणले.डाळ एकत्र करून त्या मोजूं लागल्या. प्रत्येक वेळी माप भरावे आणि बाजूच्या परातीत ओतावे असा क्रम चालला होता. पण एक माप टाकलें की दुसरे माप भरेल एवढीच डाळ तेथे शिल्लक राहावयाची. हे पाहून पार्वतीदेवींना तर आश्चर्य वाटलेच पण त्याबरोबर तेथील पुरुषांना सुद्धा आनंदाने घेरले. प्रत्येकाच्या चेहऱ्यावर एकच भाव होता. हे कसे घडले. पण घडलेले खरे होते. काय होत आहे ते अनाकलनीय होतें अखेर पार्वतीबाईंना रहावेना. त्यांनीज्याच्यावर डाळ पसरली होती ते वस्त्र गोळा केले आणि ते परातीत टाकले. अपराध्याप्रमाणे जवळच उभ्या असलेल्या प्रल्हादाजवळ त्या गेल्या. त्याच्या पाठीवरून हांत फिरवीत त्या म्हणाल्या बाळा प्रल्हादा, चल, तूं कशाला मनाला लाऊन घेतोस. जेवढी डाळ वाळत घालती होती तेवढी चांगली वाळली. तेव्हा प्रल्हाद म्हणाला नाही आई, मी तुझ्या सांगण्याप्रमाणे येथे राखण करीत बसलो होतो. मनात आले श्रीकृष्णाने एवढ्या गायी राखल्या असं म्हणतात पण तो तर काहींच करीत नव्हता. तो एका झाडाखालीं बसे आणि गायी बाजूला चरत. आई, मी या दगडावर बसून तेंच दृश्य पाहात होतो. तेवढ्यांत चार पांढऱ्या शुभ्र गायी येथे

आल्या. मला वाटले कृष्णाची नजर चुकवून त्या येथे आल्या. त्या गाईंना पाहून मला अतिशय आनन्द झाला. मी नुसता त्यांच्याकडे पाहात होतो. त्यांनी डाळ केव्हां खाल्ली ते मला समजले सुद्धा नाही. पण तुझी हाक कानावर आली तेव्हां मी त्या गाईंना हाकलून लावले. आई खरंच का ग त्या गाई कृष्णाच्या गायीच्या कळपांतून आपल्या अंगणात आल्या होत्या?

प्रल्हादाच्या या बोलण्याने पार्वतीबाई गहिवरल्या. प्रल्हादाला पोटाशी धरत त्या म्हणाल्या, असतीलही. मला तरी त्यांतलं काय कळतंय ! पण खरं सांगू मला तर वाटतं गाईंनी डाळीला तोंड सुद्धा लावलं नसावं. डाळ आहे तेवढीच आहे. पार्वतीबाई तोंडाने बोलत होत्या पण त्यांचं मन मात्र मुलाच्या कौतुकांत रमलं होतं. भगवान श्रीकृष्णांची केवढी कृपा आहे आपल्या बाळावर याचं त्यांना राहून राहून आश्चर्य वाटत होतं.

आपल्या पुत्राच्या सन्तत्वाची ही नान्दी पाहून त्या आनंदानेभाराऊन गेल्या. सन्त चमत्कार कधीच करीत नाहीत. त्यांच्या अस्तित्वामुळें सामान्याला अशक्य वाटणाऱ्या गोष्टी शक्यप्राय होतात. कल्पनाही करतां येणार नाही अशा अघटित घटना घडत असतात. सर्वांभूतीं सर्वेश्वर पाहाण्याची सन्तांची प्रवृत्ति असते. या प्रवृत्तीचा अधिपती परमेश्वर असतो. प्रवृत्ति ही मनाची एक महत्वाची दशा आहे. संतांच्या मनांत निर्माण होणारे विचार या प्रवृत्तीच्या रूपाने बाहेर पडतात ते एखाद्या पदार्थावर आघात करतात आणि तो पदार्थ सजीव होतो. सन्तांच्या मनांतील सूक्ष्म विचारस्पंदनांना आकार येतो आणि सामान्य बुद्धीच्या माणसाला तो सर्व क्रियाभाग म्हणजे एक चमत्कार वाटतो. ज्ञानेश्वरांसारख्या महापुरुषाचे विचार निर्जीवाला सजीवतेचा आकार देतात त्या त्या वस्तू सजीवाप्रमाणे या महात्म्याच्या इच्छेप्रमाणे आपण होऊन क्रिया करतात. सन्तांच्या मुखातून बाहेर पडलेला प्रत्येक शब्द सत्याचे अवगुंठण घेवूनच बाहेर पडतो. त्यामुळे असे म्हटले जाते की सन्त नेहमी सत्य तेच बोलतात आणि सत्य तेच करतात. पण ते अर्धसत्य आहे. सन्तांच्या मुखांतून जे बाहेर पडेल ते सत्याचा आकार घेते. सन्ताचे मन सत्याचाच विचार करते. त्याला असत्याचा स्पर्श कदापि होत नाहीं. सामान्य माणसाच्या विचारांत भल्याबुऱ्याचे मिश्रण असतें म्हणून त्यांचे शब्द सत्याचा आकार घेऊन दृश्यमान होत नाहींत. थोडक्यांत सन्त कधीही चमत्कार करीत नाहींत त्यांच्या अस्तित्वामुळे ते घडतात एवढे मात्र खरे.

नित्यमात्मस्वरूपं हि दृष्यं तद्विपरीतगम्।
एवं यो निश्चयो सम्यक् विवेको गरतुना स वै॥

सन्तांच्या प्रवृत्तीचे हे दर्शन परमेश्वराला नेहमीच आलिंगून असते. परमेश्वराशिवाय जगांत दुसरे काही असूच शकत नाहीं. जे दुजे वाटते तो संसार. ते दुजेपण नाहीसे होणे हा परमार्थ. या अवस्थेत रमणाऱ्या महात्म्यांना अशा अघटित घटनांची दादही नसते म्हणून त्यांना सामान्य लोक सन्त या अलौकिक बिरुदावलीने गौरवितात.

## विद्याभ्यास

प्रल्हादाचे मौंजिबंधन झाल्यावर प्रथम शिवाजीरावांनी त्याला शब्दरूपावली, समासचक्र, अमरकोश शिकविला. प्रल्हादाची बुद्धि अतिशय प्रगल्भ होती. स्मृति उत्तम होती त्यामुळे त्याला एकदा जो भाग शिकविला गेला तो त्याने त्वरेने स्मृतिबद्ध केला. त्यामुळे ज्या शिक्षणाला चार वर्षे लागावयाची ते शिक्षण त्याचे केवळ अर्ध्या काळातच संपले. यापुढे वडिलांनीच त्याला घरी पूजा, वैश्वदेव, रुद्र, पुरुषसूक्त, श्रीसूक्त यांची दिक्षा दिली. याप्रमाणे पाच वर्षांचा काळ लोटला. त्यानंतर संस्कृत काव्य आणि व्याकरण यासाठी तो मुर्डेश्वरशास्त्री **(मुर्डेश्वरशास्त्री यांच्या नावाबद्दल फारसा पुरावा उपलब्ध नाही. पंढरपुरातही त्यांची माहिती मिळाली नाही. नावात बदल असण्याची शक्यता नाकारता येत नाही. परंतु यातुन एकच गोष्ट स्पष्ट होते की प्रल्हाद महाराजांनी संस्कृतचे स्वतंत्र शिक्षण घेतले होते इतकेच नव्हे तर त्यामध्ये ते पारंगत होते.)** यांच्याकडे जाऊ लागला. स्वतः मुर्डेश्वरशास्त्री घनपाठी आणि व्याकरणतज्ञ होते. पांडुरंगाच्या सेवेसाठी ते पंढरपूर येथे येवून राहिले होते. यानंतर त्यांनी प्रस्थानत्रयीवरील आचार्य भाष्याचा सखोल अभ्यास करायला सुरुवात केली. या ग्रंथाचे वाचन करताना त्याला अनेक अडचणी येत त्यावर विचार करून त्यांची उत्तरे शोधण्यात तो दिवसही घालवीत असे. त्याला त्यातून उत्तर

मिळाले नाही म्हणजे पंढरपुरातील विविध पंडिताकडे जावे, त्यांना विचारावे असा क्रम सुरू झाला. काही ठिकाणी त्यांच्या मनाला रुचेल असे स्पष्टीकरण मिळाले तर काही ठिकाणी पुढील केवळ मार्गदर्शन लाभले. त्या मार्गदर्शनाप्रमाणे पुढे वाटचाल करीत त्यानेही प्रस्थानत्रयीचा अभ्यास केला. मनात अनेक शंका घर करून होत्या. त्यांची उत्तरे शोधण्यासाठी त्याना ज्ञानेश्वरी वाचावयास सुरुवात केली. ज्ञानेश्वरीतील स्पष्टीकरण आणि एखाद्या मुद्याबद्दल दिलेले दृष्टांत वाचून तो हरखून जात असे ज्ञानेश्वरी हातात घेतली की त्याचा दिवस कसा जात असे ते त्यालाच समजत नव्हते.

एकदा तो मंदिरात गेला असता एका पंडिताच्या प्रवचनाला उपस्थित राहिला अद्वैत वेदान्ताचे साक्षात्कारी शब्द त्याच्या कानी पडले. प्रवचन संपल्यावर तो शास्त्रीबुवांजवळ गेला आणि म्हणाला, शास्त्रीबुवा मघाशी अद्वैत वेदांताचे निरुपण करताना तुम्ही ज्या मराठी ओव्या वाचत होता त्या अर्थगर्भ ओव्या कोणाच्या? ज्ञानेश्वर महाराजांनी त्यांच्या गुरुच्या कृपेने एक ग्रंथ लिहिला त्याला अनुभवामृत असे नाव आहे. वेदान्त शास्त्रांतील हा अग्रगण्य ग्रंथ आहे ही त्या ग्रंथाची पोथी, असे म्हणून शास्त्रीबुवांनी प्रल्हादाला अनुभवामृत किंवा अमृतानुभव या ग्रंथाची पुसटशी ओळख करून दिली. पुढे या मुलाने शास्त्रीबुवांचा विश्वास संपादन करून अमृतानुभवाच्या पोथीची प्रत करून घेतली. प्रत करीत असता सहजपणे त्या ग्रंथाचे वाचनही घडत असे. तो ग्रंथ हाती आल्यावर अन्य ग्रंथांचा अभ्यास मागे पडला. केवळ ज्ञानेश्वरी आणि अमृतानुभव या ग्रंथांनी त्यांचे मन आकर्षून घेतले.

पुढे दर चातुर्मासात प्रल्हादाने पांडुरंगाच्या समोर प्रस्थानत्रयीवर प्रवचने करण्यास प्रारंभ केला. मोठमोठे पंडित त्या प्रवचनाला येत. प्रल्हादाचे निरुपण ऐकून त्यांना त्याचे कौतुक वाटे. कारण अद्वैत वेदान्त प्रतिपादन करीत असता प्रस्थानत्रयी, ज्ञानेश्वरी आणि अमृतानुभव यांचा तौलनिक निर्णय ज्या वेळी त्याच्या मुखांतून बाहेर पडत तेव्हा प्रत्येक जाणकार श्रोता वाहवा! म्हणून त्याला प्रतिसाद देत. वयाने लहान असला तरी विद्याप्रतिष्ठित असल्याने लोक त्याला आदरार्थी संबोधू लागले. रात्री पांडुरंगापुढे ते कीर्तन करीत. पंढरीनाथ सुखावे आणि ते पाहून प्रल्हादबुवांना अत्यानंद होई.

## धन्यो गृहस्थाश्रमः

याप्रमाणे वयाची बावीस वर्षे निघून गेली. शिवाजीराव आणि पार्वती यांना वाटत होते की आपल्या पुत्राने आता लग्न करावे आणि या गृहस्थाश्रमाचे ओझे आपल्या मस्तकी धारण करावे. त्याप्रमाणे एकदा दोनदा त्यांनी आपल्या पुत्राला सांगितलेही; परंतु त्याने मनावर घेतले नाही. अजून अवकाश आहे असे म्हणून त्यांनी या विषयाला बाजूस सारण्याचा प्रयत्न केला. एकदा तर प्रल्हादबुवांना पार्वतीबाई म्हणाल्या, तू लग्न केले नाहीस तर हा पांडुरंगाच्या भक्तीचा मळा कोण फुलवील तेव्हा प्रल्हादबुवा आईला म्हणाले, आई श्रीमत् शंकराचार्यांप्रमाणे अद्वैत वेदान्ताचा प्रचार आणि प्रसार करण्यासाठी ब्रह्मचर्याचे जीवनच सर्वोत्तम आहे. ब्रह्मचर्य आणि संन्यास यांचा संगम अद्वितीय आहे म्हणून आई मला वाटते, आपण आचार्यांप्रमाणे मोठे व्हावे आणि सामान्य जीवांना दिलासा द्यावा.

हे ऐकून आई म्हणाली, अरे नामदेव, नाथमहाराज यांना काही गृहस्थाश्रम आडवा आला नाही. उलट त्यांच्यामुळे गृहस्थाश्रम धन्य झाला.

आईने प्रल्हादबुवांना समजावण्याचा प्रयत्न केला. पाहू पुढे असे म्हणत प्रल्हादबुवा तेथून बाहेर पडले.

पार्वतीबाई पतीला म्हणाल्या, ऐकलं का? प्रल्हादाला मी लग्नाविषयी नाना परीने सांगितले, पण त्याचे उत्तर एकच. पाहू पुढे. अशाने आपणास नातवाचे मुख न पाहाताच या जगाचा निरोप घ्यावा लागणार. मग हा कुळाचार कोण सांभाळणार? पांडुरंगाची पूजा-आरती कोण करणार?

पार्वतीबाईंचं म्हणणं खरं होतं. शिवाजीराव तिच्या म्हणण्याला होकार देत म्हणाले. आपण आपली आर्त पांडुरंगाला सांगू. तोच त्याला काय सुचवायचे ते सुचवील. तो दयाघन आहे.

प्रल्हादबुवासारखा विद्वान जावई मिळाला तर आपल्या कन्येचे आयुष्य उजळून निघेल या विचाराने अनेक वधुपिते शिवाजीरावाकडे धाव घेत होते.

त्यांना कसे तरी थोपवीत दिवस चालले होतेच. त्यामुळे शिवाजीराव सुद्धा थोडेसे अस्वस्थ होतेच.

या वधुपित्यांना काहीतरी उत्तर देणे आवश्यक आहे. अन्यथा आपली बेअब्रू होईल असा विचार करून त्यांनी आपले दुःख पांडुरंगाला सांगण्याचे ठरविले. रात्री शेजारतीच्या वेळी ते मंदिरात आले. पांडुरंगाला पाहताच त्यांना आनंद झाला. पण त्या आनंदाच्या पोटी लपलेली चिंता त्यांनी तशीच अबोल ठेविली. लोक जमू लागले तेव्हां त्यांना आपल्या चिंतेचा विसर पडला. एकमेकांशी बोलण्यात आरतीची वेळ झाली. सर्व लोक आरती म्हणत होते. आरती म्हणजे आपले आर्त परमेश्वराला सांगणें. त्यासाठी त्याचे लक्ष आपल्याकडे वेधून घेण्यासाठी त्याची प्रथम स्तुती करावी लागते. परमेश्वर स्तुतीचा भोक्ता आहे. ही स्तुती झाली म्हणजे, आपल्या मनातील आर्त परमेश्वराला सांगायची ही परंपरा आहे. त्यांप्रमाणे शेजारती झाली. सर्व लोक परतू लागले परंतु शिवाजीरावांचा पाय तेथून निघत नव्हता. अखेर त्यांनी भावपूर्ण मनाने हात जोडले आणि पांडुरंगाला ते सांगू लागले. पांडुरंगा, तूच सर्वांची आई आहेस. बापही तूच आहेस. तुला तुझ्या लेकराचं मन कळतं ते शब्दाने सांगावं लागत नाही. आमची एकच इच्छा आहे. तुझ्या कृपेने आमच्या घरी भक्तीची ज्योत तूच निर्माण केलीस. ती ज्योत तशीच तेवती राहावी एवढीच इच्छा आहे. पाण्याने भरलेले डोळे उपरण्याने टिपत शिवाजीरावांनी पांडुरंगाला नमस्कार केला आणि ते देवळाच्या पायऱ्या उतरुं लागले.

पहाटेच्या वेळी शिवाजीराव उठले. शारीरिक धर्मकार्य उरकलं आणि काकड आरतीसाठी ते पांडुरंगाच्या मन्दिरात आले. घरी प्रल्हादबुवा जे जागे झाले ते एका स्वप्नांतूनं. ते चटकन उठले. आई मागच्या अंगणात सडा संमार्जन करीत होती. स्वयंपाक घरांतून प्रल्हादबुवांनी आईला हाक मारली तेव्हा कळले की आई मागच्या अंगणात आहे. प्रल्हादबुवा अंगणात आले. आईला नमस्कार केला आणि म्हणाले आई, मी लग्न करणार आहे. हातातली तपेली खाली ठेवीत पार्वतीबाईंनी पांडुरंगाला हात जोडले आणि त्या म्हणाल्या पांडुरंगा, तुलाच रे सगळ्यांची काळजी. आपल्या पुत्राचा प्रसन्न चेहरा पाहात त्या म्हणाल्या, कालपर्यंत तूं लग्नाला तयार नव्हतास मग एकाकी ही उपरती तुला कशी झाली. सांगतो म्हणून प्रल्हादबुवा घरात वळले. आई आपले

प्रातःकार्य संपवून घरात आली. आईला घरांत आलेली पाहून बुवा तिच्याजवळ गेले आणि म्हणाले आई पांडुरंगानी मला जागं केलं आणि सांगितलं प्रल्हादा तू त्वरित लग्न कर उद्या दुपारी एक वधुपिता आपल्या कन्येला घेवून येईल त्या मुलीशी विवाह करून गृहस्थाश्रमाला प्रारंभ कर. पार्वतीबाई उत्सुकतेनं ऐकत होत्या. त्याचा विजय झाला होता. त्यांनी पुन्हा पांडुरंगाला हात जोडले आणि म्हणाल्या, पांडुरंगा तूंच आमचा रक्षणकर्ता आणि तूंच पोशिंदा. आम्हाला तुझे खेळ कळत नाहीत हेच खरं.

काकड आरतीला गेलेले शिवाजीराव घरांत प्रवेश करीत असताना या दोघांना पाहून म्हणाले, काय माय-लेकराचं बोलणं चाललंय! आणि हातातली सगळी कामं बाजूला ठेऊन तू बोलत राहिलीस याचा अर्थ असा की, काही खास बोलणं चाललं आहे. नाही हो! पार्वतीबाई म्हणाल्या. प्रल्हादाला की नाही पांडुरंगानं लग्न करायला सांगितलं. पार्वतीबाईंचे ते शब्द ऐकून शिवाजीरावांचे डोळे पुन्हा पाणावले. उपरण्याने डोळ्यांच्या कडा टिपत ते म्हणाले, पांडुरंग माझ्या हाकेला धाऊन आला. काल रात्री शेजारतीच्या वेळी मी पांडुरंगाला सांगितलं काय आणि पांडुरंगानं केलं काय! प्रल्हादा, आतां पांडुरंगाच्या आज्ञेबाहेर जायचं नाही. तेव्हां प्रल्हादबुवांनी स्वप्नकथा पुन्हा वडिलांना कथन केली. निर्मळ आणि स्तब्ध मनाने ते ऐकत होते. आता त्यांचा हेतु लवकरच सफल होणार होता.

पांडुरंगाने स्वप्नात सांगितल्याप्रमाणे दुसऱ्या दिवशी एक वधूपिता आपल्या कन्येला घेवून प्रल्हादबुवांच्या घरी आला. ते त्याचे पंढरपुरातील परिचित असे पंढरीनाथ पुजारी होते. ते पुजारीकाका म्हणून गावात प्रसिद्ध होते. शिवाजीरावांनी त्यांचे स्वागत केले. गुळाचा खडा आणि पाणी आणून त्यांना दिले. मुलीला घरांत जायला सांगून ते समोर बसले आणि म्हणाले.

आपण आलात आनंद झाला. काय कारणानं येणं झालं?

मी आपला पुत्र प्रल्हाद यांची कीर्ति बरेच दिवस ऐकून आहे. माझी मुलगी लक्ष्मी लग्नाची आहे. आपण माझ्या मुलीला पदरांत घ्यावं आणि मला कृतार्थ करावं.

अहो ऐकलं कां? म्हणून शिवाजीरावांनी पत्नीना हाकारले.. पार्वतीबाई हातातील पदर ओठाला लावीत माजघराच्या दारात येऊन उभ्या राहिल्या.

तेव्हां त्यांच्याकडे पाहात शिवाजीराव म्हणाले पुजारीकाका म्हणतात मुलगी सून म्हणून पसन्त आहे काय?

इकडे पसन्त असली म्हणजे झालं. लक्ष्मी माझ्या पाहण्यात बऱ्याच दिवसांपासून आहे.

'लक्ष्मी' पुजारीकाकांनी आपल्या मुलीला हाक मारली. लक्ष्मी घरातून बाहेर आली. काकांनी तिला सर्वांना नमस्कार करण्यास सांगितले व नमस्कार करून ती घरात गेली. पार्वतीबाईंना नमस्कार करताच पार्वतीबाई म्हणाल्या, देवा, जोडा कसा लक्ष्मीनारायणासारखा शोभेल. मुली बस इथे देवासमोर. लक्ष्मी देवापुढे जमिनीवर बसू लागली तेवढ्यात पुढे होऊन पार्वतीबाई म्हणाल्या अगं पाट घे. असं म्हणत त्यांनी पाट मांडण्यासाठी पाटाला हात लावला तोच लक्ष्मी पुढे झाली तिने पाट घेतला आणि पार्वतीबाईंना म्हणाली, मी बसते. पण या पाटावर आपण बसावं. तिनं पाट मांडला. दुसरा पाट घेवून समोर मांडला. पार्वतीबाई पहिल्या पाटावर बसल्यानंतर लक्ष्मी शेजारच्या पाटावर किंचित अधोवदन होऊन बसली. तिच्या मुखाकडे पाहात त्या लक्ष्मीला म्हणाल्या. रूपाप्रमाणं नाव पण कसं गोड आहे. लक्ष्मी लाजली. ती काही बोलली नाही.

पार्वतीबाई उठल्या आणि म्हणाल्या थांब कुंकू लावते. देवापुढचा करंडा उचलून त्यांनी लक्ष्मीला कुंकू लावलं आणि आपल्या भालीही कुंकवाचे बोट टेकले.

लक्ष्मीच्या वडिलांच्या मुखावर समाधानाचं हास्य निर्माण झालं. ते शिवाजीरावांना म्हणाले आपण आमच्या मुलीला पदरांत घ्यायचं ठरविलंत हे केवढे तरी ऋण आहे आमच्यावर. पांडुरंगानेच कृपा केली म्हणायची.

म्हणायची कां. त्याच्या कृपेशिवाय झाडाचं पान सुद्धा हालत नाही. चुकल्या-मुकल्यांची तोच भेट घडवून आणतो आणि त्यांचा आनंद पाहात आपण एका बाजूला उभा राहातो असे म्हणत शिवाजीरावांनी हात जोडले.

कार्तिक वद्य द्वितीया शके १५६५ रोजी गोरज मुहूर्तावर प्रल्हादबुवा आणि लक्ष्मी यांचा विवाह संपन्न झाला.

# ... आणि रेणुका पंढरीस आली

प्रल्हादाचे लग्न झाले. लग्नाचा सोळा दिवसांचा सोहळा संपला तेव्हा शिवाजीराव म्हणाले, प्रल्हादा लग्न झाल्यावर कुलदेवतेच्या दर्शनाला जाण्याची आपली परंपरा आहे. आतां लग्नाचा सोहळा संपला. गृहस्थाश्रमाला आता सुरवात करण्यापूर्वी माहूरगडला जाऊन यावे.

वडिलांचे बोलणे ऐकून प्रल्हादाला आनंद वाटला. पंढरपूरहून माहूरगड पर्यंत जाऊन यायचे हे सोपे नव्हते. चालत जाणे फार कठीण. अखेर एक गाडी करण्याचे ठरले. अनेकांना त्याने विचारले पण तसा येण्यासाठी कोणी तयार नव्हता. प्रल्हादाने मग आपला मनोदय पांडुरंगाला सांगितला आणि विनंती केली की देवा आमच्या घराण्याची परंपरा आहे. माहूरच्या देवीचे दर्शन घ्यावे अशी माझ्या वडिलांची पण आज्ञा आहे ती तडीस जावी. तूच काय तो मार्ग दाखव.

दोन तीन दिवस गेले. एके दिवशी एक गृहस्थ प्रल्हादाकडे आले. त्यांचे दर्शन घेवून ते म्हणाले पंढरपूरला गेल्यावर प्रल्हादबुवांचे पण दर्शन घ्यायला विसरू नको म्हणून अनेक वारकऱ्यांनी सांगितलं. पांडुरंगाचं दर्शन घेतलं आणि आपल्या दर्शनाला आलो.

कुठून आलात.

फार लांबून आलो. माहुरची रेणुकामाता माहीत आहेन ना. तिथले आम्ही सेवेकरी.

आपण आता लगेच परत जाणार?

नाही. देवीच्या सेवेकऱ्यांसाठी घोंगड्या विकत घ्यायच्या आहेत. त्या बैलगाडीत टाकायच्या आणि पांडुरंगाचा निरोप घेवून वाटेला लागायचे.

तुम्ही गाडीनं पुढं व्हा. आम्ही मागोमाग येतो. माहूरगडची देवी आमची कुलस्वामिनी आहे. लग्नानंतर तिच्या दर्शनाला जाण्याची आमची परंपरा आहे.

इति प्रल्हाद.

मग गाडीतूनच चला की, गाडीच्या मागनं कशाला? गाडीत कोणी नाही.

प्रल्हादाला त्या वारकऱ्याचे बोलणे ऐकून आनंद वाटला. तो मनात म्हणाला - पांडुरंगानचं पाठविली ही गाडी.

मग उद्या सकाळी निघू या. कसं?

चालेल. तुमची खरेदी झाली म्हणजे सांगा. तोपर्यंत आम्ही निघण्याची तयारी करतो.

ठरल्याप्रमाणे आई-वडिलांचा निरोप घेवून प्रल्हादबुवा निघाले.

जवळ जवळ पंधरा दिवसांनी मंडळी माहूरगडाला पोहोचली. समोरचा महान उभा डोंगर चढून गेल्यावर देवळाचे दर्शन झाले. प्रल्हादबुवा आणि लक्ष्मीने स्नानादि आन्हिक उरकले आणि ते देवालयात आले. देवी पाहून उभयतांना आनंद झाला. त्यांनी देवीची यथासांग पूजा केली. श्रीसूक्ताचे पाठ केले. ब्राह्मणांना भोजन दिले. विविध दाने दिली. तीन दिवस मनाप्रमाणे पूजा-पाठ झाला. आता पंढरपूरला परत जावयाचे. मागे ज्या गाडीने आपण आलो ती गाडी आता नाही. सर्व प्रवास पायी करावयाचा होता. प्रल्हादबुवांनी देवीला विनविले. रेणुकामाते आमच्यावर कृपा कर. आमचा प्रवास सुखाचा होऊ दे. अशी प्रार्थना करून प्रल्हादबुवा देवळाच्या दारात बसले. तेव्हा त्यांच्या मनात विचार आला की पंढरपूर कोठे आणि माहुरगड कोठे. इतक्या लांब येणे कठीणच. आपण देवीला प्रार्थना करावी की तू पंढरपूरला ये. त्यांनी मनाने पांडुरंगाला नमस्कार केला आणि सांगितले. देवा तुझ्या भक्ताचे लाड तूंच पुरव. देवीला विनंती करण्याचे सामर्थ्य मला दे.

रात्री झोपताना देवीची प्रार्थना करून ते झोपी गेले. पहाटेच्या वेळी रेणुकामाता स्वप्नात आली आणि म्हणाली तुझा फारच आग्रह असेल तर मी पंढरपूरला येईन. उद्या तू निघालास की तुझ्या पाठोपाठ मी येईन पण मी येते की नाही अशा संशयाने जर तू मागं वळून पाहिलेस तर मी तेथेच थांबेन पुढे येणार नाही.

प्रल्हादबुवा जागे झाले. स्वप्न नाहीसे झाले होते, पण सत्यता मनाला जाणवत होती. प्रल्हादबुवांनी आपले स्वप्न लक्ष्मीला सांगून तिलाही आपल्या आनंदात सामील करून घेतले होते. सकाळी निघण्यापूर्वी उभयता मंदिरात आली. दोघांनी रेणुकामातेला चलावं असं म्हणून प्रार्थना केली आणि ती दोघे तेथून निघाली. पायी प्रवास. पण पंढरीनाथाच्या स्मृतीमध्ये त्याचा शीण वाटत नव्हता. येताना भलंस गाव पाहून मुक्काम करावा आणि सकाळी पुढे चालू लागावं या प्रमाणे प्रवास चालू होता. या प्रवासात पांडुरंगाच्या नामघोषापुढे देवीची आठवण सुद्धा झाली नाही. देवीचे काम देवी करीत होती होता होता बरेच दिवस गेले. पंढरपूरला मंडळी आली महाद्वारात येताच त्याच्या मनात आलं आपण देवीला पंढरपूरला ये म्हणून प्रार्थना केली. प्रवासात पांडुरंगाचे नामगायन चालले होते त्यामुळे देवी रेणुकेची आठवण सुद्धा झाली नाही. आपण आता पंढरपूरी आलो देवी आपल्याबरोबर आली असेल कां? या विचाराने प्रल्हादबुवांनी मंदिराच्या महाद्वारापाशी येताच नामदेव पायरीवरून मागे वळून पाहिले. वीज चमकावी तसा एक प्रचंड प्रकाश शंभर/दोनशे पावलांवर त्यांना दिसला. त्यांचे डोळे दिपले. पण जेव्हां त्यांनी डोळे उघडले तेव्हा तो प्रकाश नाहीसा होऊन त्या ठिकाणी देवी असलेली त्यांनी पाहिली. त्यांना देवीने सांगितले होते ते लक्षात आले आणि देवी यापुढे येणार नाही. देवी तेथेच थांबली. प्रल्हादबुवा धावत देवीजवळ गेले. तिच्या पायी मस्तक नम्र करीत देवीला म्हणाले - माते मला क्षमा कर. तुझ्या बोलण्यावर विश्वास न ठेवता मी मागे पाहिले. माझी मोठी चूक झाली पण आता येथून तू पर जाऊ नकोस.

ज्या ठिकाणी देवी थांबली त्याच ठिकाणी बडवे मंडळींनी तिचे मंदीर उभारले आणि तिची प्रतिष्ठापना केली.

---

* (टीप : रेणुकामातेचे हे मंदिर आजही आपणास पंढरपुरात महाद्वार रस्त्याने नदीकडे जाताना वाटेत पहावयास मिळते. सध्या मंदिराचे तोंड दक्षिण दिशेला आहे. पूर्वी ते महाद्वार रस्त्याकडे उत्तरेस असावे असे वाटते. समस्त बडवे कुळातील लोक कुलदेवता दर्शनास माहूरला जातात पण प्रल्हादमहाराजांचे वंशज मात्र आजही माहूरला न जाता याच रेणुकेचे दर्शन घेतात.)

# पाठशाला : अध्यापन

पंढरीनाथाच्या आज्ञेप्रमाणे प्रल्हादबुवांचा गृहस्थाश्रम चालू झाला. लक्ष्मीसारखी सून मिळाली याचा आनंद शिवाजीराव आणि पार्वतीबाईंना झाला होता.

प्रल्हादबुवा पहाटे उठत. स्नानादि नित्यकर्म संपवून पांडुरंगाच्या मंदिरात जात. पांडुरंगाची पूजा वगैरे झाली की घरी येत. लग्न झाल्यावर त्यांनी आपल्याच घरी पाठशाळा चालू केली. या पाठशाळेत येणारे विद्यार्थी तेथेच राहात आणि विद्या संपादन करीत. या ठिकाणी संस्कृत व्याकरण, काव्य, यांच्याबरोबर मीमांसा ब्रह्मसूत्र भगवद्गीता, उपनिषदे यांचे ही अध्यापन करण्यात येत असे. प्रल्हादबुवा स्वतः अध्यापकाचे काम करीत. दुपारी सर्व विद्यार्थी एकत्र जमत आणि आपणास अध्ययनात आलेल्या शंकांबद्दल चर्चा करीत. यावेळी कधीं कधीं शिवाजीरावही उपस्थित राहात आणि त्यांच्या चर्चेत भाग घेत. त्यामुळे या विद्यार्थ्यांमध्ये धीटपणा येत असे त्याचप्रमाणे अन्यांना मार्गदर्शन पण घडत असे.

रोज दुपारी सर्व विद्यार्थी तेथेच आपले जेवण करीत त्यांच्या जेवणात ज्वारीची भाकरी, भात, आमटी, भाजी वगैरे पदार्थ असत. प्रथम प्रथम विद्यार्थी दोन-चारच होते. तेव्हा पार्वतीबाई आणि लक्ष्मी यांच्या भोजनाची व्यवस्था करीत. थोड्याच दिवसात यामध्ये खूप वाढ झाली विद्यार्थ्यांचे पालक आपल्या शेतात तयार होणाऱ्या पिकांपैकी काही भाग या पाठशाळेला आणून देत. ह्यामुळे भोजनाचा प्रश्न निर्माण होत नसे. पुढे तर हे विद्यार्थीच स्वतः स्वयंपाक करीत आणि भोजनाचा आस्वाद घेत. एकादशीच्या दिवशीं प्रल्हादबुवा सर्व छात्रांना घेवून पांडुरंगाच्या मंदिरात जात. पांडुरंगावर पवमानाचा अभिषेक करीत ह्या दिवशी उपवास असे. रोजचे जेवण नसे. विविध प्रकारची फळे, रताळी, सुरण कणगर वगैरे सारखे कन्द, शेंगदाणे वरीतांदूळ, गूळ, मिरची वगैरे पासून तयार केलेले उपवासाचे पदार्थ उपवासाच्या निमित्ताने सर्व भक्षण करीत. रात्री प्रल्हादबुवा पांडुरंगाच्या

मंदिरात कीर्तन करीत. कधी एखादा विद्वान आणि शास्त्रविद पुरुष पंढरपुरात आला तर त्याचे प्रवचन मंदिरात होत असे त्यावेळी सर्व विद्यार्थी प्रल्हादबुवांचे मातापिता पत्नी आणि पंढरपुरातील राजमान्य विद्वान देखील उपस्थित असत. प्रल्हादबुवांच्या भक्तिपूर्ण आणि रसाळ कीर्तनामुळे श्रोतृवृंद तर आनंदित होत असेच पण त्याबरोबर पांडुरंगही स्मित हास्य करीत कीर्तन ऐकत असत.

## रुक्मांगद पंडिताचा अधिकार

यावेळी विजापूर येथे मुसलमानी राज्य होते. छत्रपती शिवाजी महाराजांचे वडील विजापूरकरांचे मान्यवर सरदार म्हणून सेवा करीत असत. याच काळात शहाजीराजांनी आपल्या पुत्राला विजापूर येथे बादशाहाच्या दरबारी नेले होते. त्या ठिकाणी बादशाहाला मुजरा करण्यास शिवाजीने नकार दिल्याने शहाजीराजांवर बादशाहाची गैरमर्जी झाली होती. परंतु बादशाहाने ती स्पष्टपणे दाखविली नाही. ही गोष्ट शाहाजीराजांच्या लक्षात आली होती. याचा परिणाम असा झाला की, विजापूर येथील हिंदूंच्या आचार व्यवहारावर न कळत बंधने आली. ब्राह्मणांची कर्मे व्यवस्थित होत नव्हती. यावेळी रुक्मांगद नावाचे एक प्रकांड पंडित आणि पांडुरंगाचे भक्त तेथे राहात होते. ते उत्तम वैद्य होते. आपल्या ज्ञानाचा उपयोग दीनदुबळ्यांना व्हावा म्हणून ते अशा लोकांची नेहमी सेवा करीत. या सेवेबद्दल लोक त्यांना धन, धान्य, वस्त्रे देत. रुक्मांगद पंडित त्या सर्वांचा उपयोग लोकांसाठी करीत. एकादशीच्या दिवशी त्यांच्याकडे कोणी ब्राह्मण आला तर पांडुरंगच आपल्याकडे आले आहेत अशा समजुतीने त्याची ते पाद्यपूजा करीत. धन, वस्त्रे, भोजन देऊन त्याला संतुष्ट करीत आणि आनंदाने निरोप देत. त्यांचा हा क्रम बरेच दिवस चालू होता.

आपल्या या भक्ताला भेटावे अशी पांडुरंगाला एकदा इच्छा झाली. तेव्हा पांडुरंगाने एक युक्ती केली. बडवे मंडळीच्या स्वप्नांत जाऊन त्यांना सांगितले

की मला जलोदर झाला असून उदरांत अधिक झालेले पाणी माझ्या नाभिकमलांतून बाहेर पडत असून त्यामुळे मला वेदना होत आहेत. माझ्या परम भक्ताचा माझ्या नाभीला अंगुष्टस्पर्श झाला तरच माझ्या वेदना शमतील. तुम्ही माझ्या परमभक्ताला येथे पंढरपुरांत घेवून या आणि माझ्या वेदना शमतील असे करा.

सकाळ झाली. समस्त बडे मंडळींत एकच चर्चा चालू झाली. सर्व मंडळीं देवळात जमली पाहातात तो पांडुरंगाच्या नाभीकमलांतून थेंब थेंब पाणी ठिबकत असून पांडुरंगाचा चेहरा व्याकूळ झाला आहे. अखेर सर्वांनी प्रल्हादबुवांना विचारले की, ज्याच्या स्पर्शाने पांडुरंगाची व्याधी संपेल असा भक्ताला घेवून येणे आवश्यक आहे. असा महान भक्त कोण आहे? आम्हाला तर मुळीच समजत नाही.

प्रल्हादबुवा म्हणाले- तुकाराम महाराजांनाच आपण घेवून येवू. त्यांच्या इतका महान भगवदभक्त निदान माझ्या तरी ऐकीवात नाही.

प्रल्हादबुवांच्या म्हणण्याला होकार देत सर्वजण प्रल्हादबुवांना म्हणाले, तुम्हीच जा आणि महाराजांना घेवून या. रामेश्वरभट्टांच्या शरीराचा दाह महाराजांनीच नाहीसा केला. या बाबतीत त्यांची कीर्ति महान आहे.

प्रल्हादबुवा आणि अन्य दोन सज्जन देहूला जाण्यासाठी निघाले. बरोबर पांडुरंगाच्या गळ्यातील तुळशीची माळ आणि चरणीचा बुक्का त्यांनी बरोबर घेतला आणि त्वरेने ते निघाले. ज्यावेळी ही मंडळी देहूला पोहोचली तेव्हा तुकाराम महाराज भंडाऱ्या डोंगरावर जाण्यासाठी निघाले होते. या मंडळींना समोरून येताना पाहून तुकाराम महाराजांनी रस्त्यावर त्यांना साष्टांग नमस्कार घातला. तुकाराम महाराज प्रल्हादबुवांना म्हणाले माझ्या पांडुरंगाने काय सांगावा पाठवला आहे. ते असे म्हणताच प्रल्हादबुवांनी पांडुरंगाचा प्रसाद त्यांच्या हाती ठेवला. साष्टांग नमस्कार घातला आणि हात जोडून ते म्हणाले, महाराज पांडुरंगांना जलोदर झाला असून त्यांनी आम्हाला सांगितलं की, माझ्या परम भक्ताच्या बोटाचा स्पर्श जर माझ्या नाभीला झाला तर माझ्या वेदना संपतील. आपल्यापेक्षा आणखी मोठा आणि पांडुरंगाचा दुसरा भक्त कोण आहे? तेव्हा आपण चलावं आणि पांडुरंगाचे रोगनिवारण करावे.

भवरोगासारख्या असाध्य रोगाचं निवारण करणाऱ्या पांडुरंगानं स्वतःचा रोग बरा करण्यासाठी भक्तांची प्रतीक्षा करावी हे सर्व विपरितच दिसतं. तुम्हाला सांगू? पांडुरंग नाटकी आहे. त्याचं नाटक सहजासहजीं कोणाच्या लक्षात येणार नाहीं. तुकाराम महाराज.

तुकाराम महाराजांचं हे भाषण ऐकून प्रल्हादबुवा म्हणाले, महाराज आम्ही अज्ञ. आम्हास हे कसं कळावं.

तुकाराम महाराज काहीतरी आठवल्यासारखं करून म्हणाले तुम्ही असं करा. विजापूरला जा. तेथे रुक्मांगद पंडित नावाचे एक महात्मे आहेत. ते वैद्यही आहेत. त्यांना घेवून जा.

तुकारामाच्या उपदेशाप्रमाणे या मंडळींनी विजापूर येथे जाऊन रुक्मांगद पंडितांना आणले. त्यांनाही पाडुरंगाच्या भेटीची तळमळ लागली होती. ठरल्याप्रमाणे पंडितांना घेवून सर्व मंडळी पांडुरंगाच्या मंदिरात आली. पांडुरंगाचा चेहरा पाहून पंडितांना वाटले की, पांडुरंगाला खरचं जलोदराच्या वेदना होत आहेत. ते जवळ गेले. पांडुरंगाच्या पायावर मस्तक ठेऊन त्यांनी नमस्कार केला तेव्हा पांडुरंगाच्या बेंबीतून थेंब थेंब गळणारे पाणी पंडितांच्या मस्तकावर पडले. तेव्हा पंडिताना कळून आले की देवाला खरोखरीच जलोदर झाला आहे. त्यांनी पांडुरंगाच्या मुखाकडे पाहिले. आपली पडशी आपल्या खांद्यावर आहे या समजुतीने त्यांनी हाताने खांद्याला स्पर्श केला पण ती तेथे नव्हती. ते पांडुरंगाला म्हणाले देवा, रोगांचा रोग सुद्धा तुमच्याजवळ येण्यास धजत नाही मग ह्या रोगाने तुम्हाला कसा स्पर्श केला आणि तुम्ही त्याला उदरी थारा दिलात. आश्चर्यच आहे. पण देवा तुमचा वर्ण धारण करणारा आणि निर्मळ चन्दनाचा सुगंध उदरी बाळगणारा बुक्काच फक्त यावर एकमेव औषध आहे. हा बुक्का भाळी लावला तर सटवी सुद्धा धास्तावते आणि नवजात बालकाच्या कपाळी तुझ्या वैभवाची प्रतिष्ठा करते. भवरोग सुद्धा बुक्का लावलेल्या भक्तापासून लांब पळतो. निरनिराळी रुपे धारण करणारी भुतावळ कोठे गडप होते ते समजत सुद्धा नाही. तुझ्या चरणीच्या बुक्क्याचे असे महात्म्य असता अन्य औषधांची वाटच कशाला बघायची. पांडुरंगा तुझंच घ्यायचं आणि तुला द्यायचं त्यामध्ये माझ्या नसत्या अहंकाराची उठाठेव कशाला?

पंडितांनी एवढे बोलून पांडुरंगाची पूजा केली. एकादशीच्या निमित्ताने अनेक भक्तगण दर्शनासाठी जमले होते. त्यांना देखील पंढरीनाथ थकले-भागलेले वाटत होते. पंडितांनी पूजा होताच हाती बुक्का घेतला सर्वांनी जयजयकार केला.

**पुंडलीक वरदे हरिविठ्ठल।**
**विठोबा रखुमाई विठोबा रखुमाई॥**

अशा नामघोषात पंडितांनी आपल्या आंगठ्यानी पांडुरंगाच्या कपाळी बुक्का लावला आणि तोच बुक्का लागलेला आंगठा पांडुरंगाच्या नाभीवर ठेवळा. पुन्हा पंढरीच्या नावाचा गजर झाला. पांडुरंगाच्या बेंबीतून पडणारा पाण्याचा थेंब एकदम थांबला. त्याचवेळी आषाढी एकादशीच्या वारीनिमित्त आलेले तुकाराम महाराज आनंदाने म्हणाले, पांडुरंगा आपल्या भक्ताला भेटण्यासाठी तू काय काय करतोस ते ध्यानी आलं. रात्री तुकाराम महाराजांचे कीर्तन झाले. कीर्तनात पांडुरंग डोलले, श्रोते डोलले (हा दिवस आषाढ शुद्ध एकादशी सोमवार शके १५६८ इ.स. १६४६ होता.)

पांडुरंगाचा रोग बरा झाला. त्यादिवशी तुकाराम महाराजांचे कीर्तन ऐकताना प्रल्हादबुवांना सारखे वाटे तुकारामबुवा पांडुरंगाचे एवढे महान भक्त असतां त्यांनी आम्हास रुख्मांगद पंडिताकडे का पाठविले. तुकाराम महाराजांना काय अशक्य होते म्हणून त्यांनी आम्हाला असे सांगितले. द्वादशीच्या दिवशी प्रल्हादबुवांनी महाराजांना प्रसाद भोजनासाठी आमंत्रण केले होते. दुपारी रुख्मांगद पंडित, तुकाराम महाराज, शिवाजीराव जेवण्यास बसले. तेव्हा रुख्मांगद पंडित म्हणाले, महाराज तुमच्या कृपेमुळे मला पंढरीनाथांचे दर्शन झाले अन्यथा आम्ही त्या विजापुरांतच तळमळत पडलो असतो. पंडितांचे बोलणे ऐकून तुकाराम महाराज म्हणाले, पंडितराज पांडुरंगाला तुमच्या भेटीची तळमळ लागली होती. प्रल्हादबुवांनी पांडुरंगाचा प्रसाद मला आणून दिला त्या प्रसादानेंच मला सांगितले की माझा एक भक्त विजापुरात तळमळत आहे. त्याला कोणीतरी घेवून येणे अगत्याचे आहे. पांडुरंगाच्या इच्छेपुढे कोण काय करणार?

जेवणे झाली पंडितांनी तुकाराम महाराजांचा सत्कार केला. प्रल्हादबुवा आणि शिवाजीराव यांनीही त्यांचा सत्कार केला. त्यांच्या चरणी मस्तक ठेविले

आणि त्यांचा आशीर्वाद घेतला. तुकाराम महाराज नंतर निघून गेले. त्यानंतर पुन्हा प्रल्हादबुवांचे विचारचक्र चालू झाले. तुकाराम महाराज म्हणाले त्याप्रमाणे पंढरीनाथांना आपल्या कोणत्या भक्ताची आठवण केव्हा येईल ते सांगता येणार नाही हेच खरे. पंडितांचा परिचय झाला त्यांना आपण ठेवून घ्यावे आणि त्यांच्याकडून अकांक्षत भक्तीचे धडे घेवून ते गिरवावेत.

पंडित प्रल्हादबुवांना म्हणाले, बुवा तुमच्यामुळे पांडुरंगाचे आणि तुकाराम महाराजांचे दर्शन लाभले. माझे जीवन कृतार्थ झाले मी आता आपला निरोप घेवून गावाकडे निघतो. लोक माझी वाट पहात असतील तरीही प्रल्हादबुवांनी पंडितांना चार दिवस ठेवून घेतले. पंडितांची कीर्ति पांडुरंगाच्या या चमत्कारामुळे सर्वत्र पसरली. गावोगावचे लोक त्यांच्या दर्शनासाठी येत. त्यांच्याजवळ पांडुरंगाच्या प्रेमाच्या गप्पा कराव्यात आणि निघुन जावे असा क्रम चालू होता. दुपारी जेवणानंतर प्रल्हादबुवा आणि अन्य विद्वान मंडळी जमत. त्यांच्याबरोबर वेदान्त चर्चा करावी याप्रमाणे चार दिवस केव्हाच निघून गेले अखेर पंडितांनी सर्वांचा प्रेमळ निरोप घेवून आपल्या गावी विजापुरास प्रस्थान ठेवले.

या घटनेनंतर प्रल्हादबुवांचे पांडुरंगप्रेम अधिक वाढीस लागले. त्यांचा संसारही फुलू लागला होता. शके १५५९ रोजी त्यांना पुत्राचा लाभ झाला हा आनंद घरोघरी पोहोचला. शिवाजीराव आणि पार्वतीबाई यांची कामना सफल झाली होती. त्यांच्या वंशाचा दिवा पाजळला होता. प्रल्हादबुवांनी मोठ्या थाटाने त्या पुत्राचे **'रामचंद्र'** असे नामकरण केले. तो सोहळा पाहून शिवाजीराव आणि पार्वतीबाई यांनी एका वर्षातच एका पाठोपाठ देह ठेवले. एकीकडे कडक ऊन तर दुसरीकडे शीतल सावली अशा द्वंद्वात प्रल्हादबुवा होते. पांडुरंगाच्या कृपेने कडक ऊन हळूहळू नाहीसे होत सर्वत्र शांत सावली पसरली. पुत्राची बाललीला घरी चालू होत्या. त्याचवेळी ते श्रीमत् भागवताच्या दशम स्कंदावर पांडुरंगाच्या मंदिरात निरुपण करीत होते. दोन्ही ठिकाणी एकच आनंद. मंदिरात मनाने आनंद लुटावा आणि घरी आल्यावर तशाच बाललीला नेत्रांनी पाहाव्यात असे आनंदी जीवन चालू होते.

# तुकाराम महाराजांचे कीर्तन

ज्येष्ठ मास उजाडला पावसाची सुरुवात झाली. आता सर्वांचे डोळे पांडुरंगाच्या भेटीकडे लागले. देहूहून तुकाराम महाराज निघाले बरोबर नेहमीचे टाळकरी होतेच. तुकाराम महाराज आपल्या टाळकऱ्यांसह निघाले ते माळशीरस येथे आले तेथील गाव पाटलाने त्यांचा आदर सत्कार केला आणि मारुतीच्या मंदिरात त्यांना घेवून गेले त्यांना तेथे अतिशय प्रसन्न वाटले ते तेथेच राहिले तेव्हा पाटील म्हणाले, महाराज आमच्या गतजन्मीच्या पुण्याईनं आपले पाय आम्हाला दिसले. आपण कीर्तन करावं आणि आम्ही गावकऱ्यांनी ते ऐकावं असं आम्हाला वाटतं. ठरल्याप्रमाणे रात्री महाराजांचे कीर्तन झाले झाले. त्यावेळी मारुतीचे आपल्या शब्दात वर्णन करताना महाराज म्हणाले,

**शरण शरण हनुमंता। तुज आलो रामदूता।।**
**काय भक्तीच्या त्या वाटा। मग दाव्याण्या सुभटा।।**

तुकाराम महारांजाच्या कीर्तनाने हनुमंत इतके आनंदले की कीर्तनाच्या अखेर हनुमंतानी मोठा भुभुःकार करून आपला आनंद प्रकट केला. त्या दिवसापासून हनुमंताची प्रचिती लोकांना येवू लागली. त्यांचे हे वृत्त ते पंढरपूर येथे येण्यापूर्वीच पंढरपूरला येवून धडकले होते. त्यामुळे त्यांच्याबद्दलचा आदर आणखीनच वाढला. तुकाराम महाराज पंढरपूरला आले, वेशीवर जाऊन प्रल्हादबुवांनी तुकाराम महाराजांचे स्वागत करून त्यांना घरी आणले. आपल्या पुत्राला तुकाराम महाराजांच्या पायावर घालून लक्ष्मीने महाराजांचे आशीर्वाद घेतले. दुसऱ्या दिवशी आषाढी एकादशी होती. पांडुरंगाची पूजा करण्यासाठी तुकाराम महाराज आणि प्रल्हादबुवा मंदिरात आले. पूजा सुरू झाली तेव्हा तुकाराम महाराज पांडुरंगाच्यासमोर बसून एकचित्त पाहात होते. क्षणाक्षणाने प्रेमभाव बळावत होता. महाराजांच्या नेत्रांतून प्रेमाश्रू वाहात होते. पूजा संपली महाराज उठले. त्यांनी प्रेमाने पांडुरंगाला आलिंगन दिले आणि आपल्या कंठात रुळणारी तुळशीची माळ पांडुरंगानी तुकाराम महाराजांच्या गळयांत घातली. महाराजांचा आनंद ओसंडत होता. प्रल्हादबुवा हे सर्व पाहात होते. त्यांचेही नेत्र ओसंडत होते. रात्री महाराजांचे कीर्तन झाले. कोंबडा आरवला तेव्हा सर्वांना जाग आली कीर्तन संपले. काला झाला महाराजांनी पांडुरंगाचा आणि प्रल्हादबुवांचा निरोप घेतला आणि आपल्या टाळकऱ्यांसह पंढरीची वेस ओलांडली.

# अफजलखानाचे संकट

तुकाराम महाराजाचे वैकुंठगमन झाले त्यानंतर रुख्मांगद पंडित पुन्हा पंढरपूर येथे आले. मागे ज्याप्रमाणे लोकांनी त्यांचा सत्कार केला होता तसा यावेळीही प्रल्हादबुवा त्यांना घेऊन आपल्या घरी आले. मागच्या आठवणींना उजाळा देत आणि गत काळात घडलेल्या अनेक गोष्टींचा समाचार घेण्यात बरेच दिवस निघून गेले. बोलण्याच्या ओघात पंडित म्हणाले, भक्तीमुळे मनाला स्वस्थता लाभते म्हणून पांडुरंगाच्या दर्शनाची ओढ लागते. विजापूरला कुठला धर्म कुठले देऊळ देवाची तर वार्ताच सोडा, विजापूरला आदिलशहाचे राज्य आहे सुलतानी अंम्मल. देव-देवता कोणत्याही मार्गाने नष्ट करणे हे तर या सुलतानाचे आवडते कार्य परंतु असे करता करता आता त्यांच्या राज्यात फारशी देवळे राहिलीच नाहीत त्यामुळे त्याचा क्रोध ओसरला असावा. त्यांच्या पदरी शहाजीराजांसारखे मराठी सरदार आहेत. त्यांचे पण या सुलतानाच्यासमोर काही चालत नाही. आता शिवाजीने मनावर घेतले आहे त्यातून काही चांगले होण्याची मात्र खूप आशा आहे.

याच वेळी विजापूर दरबारात शिवाजीच्या पुंडगिरीची चर्चा चालू होती. आदिलशहाने त्याबद्दल शहाजीराजांना कळविले होते त्याचे उत्तर घेवून जासूद दरबारांत उपस्थित झाला होता. शहाजीराजांनी सुलतानाला कळविले होते की माझा पुत्र माझे मुळीच ऐकत नाही. त्यांचे काय ते तुम्हीच पाहून घ्या या उत्तरावर सुलतानाने दरबारांतील सर्व सरदारांना विचारले शिवाजीला पकडून आणणे किंवा ठार करणे एवढेंच शिल्लक राहिले आहे. हे काम करण्यास जो कोणी तयार असेल त्याने पुढे येवून तबकातला विडा उचलावा. सुलतानाच्या या आव्हानाबरोबर अफजलखान नावाचा धिप्पाड आणि शूर सरदार पुढे झाला आणि त्याने पैजेचा विडा उचलला.

छत्रपती शिवाजीराजांना पकडून आणणे अगर ठार करण्याच्या ईर्षेने अफजलखान विजापूराहून निघाला त्याच्याबरोबर अगणित फौज होती. विजापूर येथून निघाल्यावर त्याने वाटेत येणाऱ्या गावावर धाडी घालून ती गावे लुटली. हिंदूंची देवळे पाडली, स्त्रियांचा अपहार केला. त्याच्या अफाट सैन्यामुळे त्याला कोणी विरोध करण्याचे धाडस केले नाही. काही ठिकाणी

शेतातील उभी पिके सुद्धा त्याने जाळून टाकली अनेक गावांना आणि वस्त्यांना आगी लावल्या. आपणास विरोध करण्यास कोणीच पुढे येत नाही आपणास सर्वजण भिऊन पळून गेले आहेत हे पाहून त्याला अधिकच चेव आला. सोलापूरमार्गे तो अणदूर येथे आला तेथे खंडोबाचे देवस्थान आहे. अफजलखान येत आहे असे समजतांच तेथील पुजाऱ्यांनी देवाला सांकडे घातले पण त्याचा उपयोग झाला नाही. अफजलखान गावात शिरला लोक आपला जीव वाचविण्यासाठी देवळाच्या आश्रयाने धावू लागले, पण अफजलखानाच्या निर्दय सैनिकांनी या सर्वांची कत्तल केली. अफजलखान तसाच देवळात शिरला. तेथील खंडोबाची मूर्ति त्याने छिन्नविछिन्न करून तुकडे इतरत्र फेकून दिले. पुजारी अणि इतरांना कंठस्नान घालून आवेशाने तो पुढे निघाला.

येता येतां. छत्रपतींची कुलस्वामिनी भवानीमातेच्या तुळजापुरांत अफझलखान आला, त्याला समजले की येथील देवी शिवाजीची कुलस्वामीनी आहे. त्यांमुळे तर आणखीनच चेव आला तो मंदिरात आला. तेथेच गाय कापून तिचे रक्त देवळांत आणि देवळाच्या परिसरात शिंपडले नंतर देवीसमोर आला. तिच्याकडे डोळे वटारुन पाहात शस्त्र उगारुन तो तिला म्हणाला, 'बताव तेरी करामत! बताव तेरी अजमत!! त्याने देवीवर घाव घातला. एका घावाने त्याचे समाधान झाले नाही म्हणून दात-ओठ आवळून त्याने देवीच्या मूर्तीवर दणादण घाव घातले. देवीची मूर्ति विद्रुप झाल्यावर त्याने ती उचलून डोंगरावरून खाली भिरकावून दिली. त्या देवीच्या सिंहासनावर तो नाचला. देवीच्या अंगावर असलेल्या दागिण्यांची लूट करून तो तेथून निघाला.

जाता जाता तो करकंब येथे आले तेव्हा त्याला कळले की येथून जवळच पंढरपूर आहे हिंदूंचे ते अतिशंय प्रवित्र ठिकाण आहे ते ठिकाण उध्वस्त करण्याच्या इराद्याने त्याने आपला मोर्चा पंढरपूरकडे वळविला.

रुख्मांगद पंडित त्यावेळी पंढरपुरी पांडुरंगाच्या दर्शनासाठी आले होते. विजापूरकरांचा सरदार अफजलखान पंढरपूरवर चालून येत असल्याची वार्ता पंढरपूरांत येवून धडकली पर त्यांची भीतीने गाळण उडाली ते लोकांना म्हणाले, हा सरदार अत्यंत बलाढय, नीच क्रूरकर्मा आहे. दया हा शब्द त्याला माहीत नाही. हिंदु म्हटले की त्याच्या क्रोधाला पारावार राहात नाही. हिंदूची देवळे तोडणे, गावाची जाळपोळ करणे यामध्ये याला आपण काही अन्याय करीत आहोत असे वाटत नाही. किडामुंग्या मारांव्यात त्याप्रमाणे त्याचे सैनिक

माणसांची कत्तल करतात. ते प्रल्हादबुवांना म्हणाले आपल्यावर हे महान संकट आले आहे. प्राणपणाने आपण पांडुरंगाच्या मुर्तीचे रक्षण केले पाहिजे ते ऐकताच प्रल्हादबुवा म्हणाले, **अमूर्तिरनघो ऽचिन्त्यो भयकृत्भयनाशन** :(वि.स.१०२) ज्या पांडुरंगाने हे संकट आणले आहे त्याच्याच कृपेने ते नाहीसे करण्याची बुद्धी आणि सामर्थ्य आपणास देईल. दुपारी पंढरपुरांतील समस्त बडवे मंडळी, शास्त्री आणि साधक यांची सभा झाली. या सभेत संकटाचे निवारण कसे करावे याची चर्चा झाली आणि मूर्ती रक्षणाची सर्व जबाबदारी प्रल्हादमहाराजांवर सोपविण्यात आली. प्रल्हादबुवा म्हणाले, लोकहो पांडुरंगाची मूर्ति आपण इथून हलवावी आणि सुरक्षित आणि गुप्त स्थळी नेऊन ठेवावी. मला वाटते आमच्या घराचे बळद मोठे आहे आत जाण्याची वाट शोधून सुद्धा लवकर कोणाला सापडणार नाही शिवाय देवळाला लागूनच आहे. संकट नाहीसे झाले म्हणजे पुन्हा आपण पांडुरंगाची मूर्ति येथे प्रस्थापित करू. प्रल्हादबुवांचे म्हणणे लोकांना पटले. या सर्वांनी या कृतीला सम्मति दिली. ठरल्याप्रमाणे दुसऱ्या दिवशी सर्व मंडळी जमलीं. पांडुरंगाची पूजा अभिषेक झाल्यावर प्रल्हादबुवानी पांडुरंगाच्या नावाचा जयघोषं करीत मूर्ति उचलली आणि प्रल्हादबुवांच्या घरी आणून खालच्या तळघरात मुद्दाम तयार केलेल्या स्थळी नेऊन ठेवली. पांडुरंगाचा निरोप घेऊन मंडळी बाहेर पडली. दोन दिवस गेले येणार येणार म्हणून ज्याची आवई उठली होती. तो अफजलखान अखेर पंढरपूरात आला नदीच्या काठी येताच तेथील पुंडलिकाच्या मंदिरातील शिवलिंग त्याने चंद्रभागेत फेकून दिले. समोर पांडूरंगाचें मंदिर पाहून त्याला काय करू आणि काय नको असे होऊन गेले. त्याने देवळात प्रवेश केला. सोळखांबीपर्यंत आला तेथून पाहिले तर मूर्ति देवळात नव्हती तो म्हणाला, या अफझूलखानाला भिऊन देव पसार झाला. देवानं सुद्धा माझी धास्ती घेतली. सोळखांबीजवळ त्याने गाय मारली. तिच्या रक्ताचा सडा घातला. त्यावर तो बेछुटपणे नाचला. गायीच्या शरीराचे तुकडे करून इतरत्र विखुरले. देऊळ भ्रष्ट केले. त्यावेळी त्याला कोणी विरोध केला नाही. तरीपण नेहमीप्रमाणे जाळपोळ लुटालुट वगैरे करून अफजलखान फलटणच्या दिशेने निघून गेला.

अफजलखानाच्या वधाची वार्ता आल्यानंतर प्रल्हाद महाराजांनी, पांडुरंगाची मूर्ती बळदातून सन्मानाने मिरवत मंदिरात आणली. नेहमीच्या ठिकाणी प्रतिष्ठित करून तिची यथायोग्य पूजा, अभिषेक नैवेद्यहि उपचार झाले. पांडुरंगाची मूर्ति पुन्हा स्वस्थानी आल्याबद्दल सर्वांनी आनंदोत्सव केला.

# ज्ञानेश्वरी प्रतिलेखन

एके दिवशी पहाटे प्रल्हादबुवा जागे झाले ते एका स्वप्नांतून. स्वप्नात ते आळंदीला गेले होते. स्नानादि कार्यक्रमानंतर ते अजानवृक्षाखाली आले आणि त्यांना जाग आली. याचा संदर्भ शोधण्याचा त्यांनी प्रयत्न केला पण त्यांना तो लागेना. रोज ज्ञानेश्वरी वाचन करावे हा त्यांचा एक नियम होता. त्याप्रमाणे ते ज्ञानेश्वरी वाचू लागले. अठरावा अध्याय चालू होता.

**गीतेचा पाठु जो जाणें। तयाचेनि सांगातीपणे ॥**

**गीता लिहोनी वाहणे। पुस्तकमिषें ॥** (ज्ञाने. १८-१४६०)

या ओवीने त्यांचे लक्ष वेधून घेतले. चार-चार वेळा ओवीचे वाचन झाले पुढे वाचन होत नव्हते. ते किंचित थांबले आणि मनाशीच म्हणाले, म्हणजे एकूण असे आहे, तर पोथी नीट गुंडाळून ठेवीत ते लक्ष्मीला म्हणाले ऐकलं का मला ज्ञानेश्वर महाराजांचे बोलावणे आले आहे. सच्चिदानंद बाबांनी ज्याप्रमाणे ज्ञानेश्वरी लिहिली त्याप्रमाणे ज्ञानेश्वरांजवळ बसून मी ज्ञानेश्वरी लिहावी असा त्यांचा मानस आहे. आज पहाटे मी स्वप्नांतूनच जागा झालो तेव्हा आळंदीला अजानवृक्षाच्या छायेतच होतो. पहाटेच्या स्वप्नाचा अर्थ आता समजला.

लक्ष्मीने हे ऐकले ती म्हणाली, ज्ञानेश्वर महाराजांनी बोलावलं ही आपली पूर्वपुण्याईच आहे आपण जावं आपल्या बोलण्याने मला खूप आनंद वाटला.

ठरल्याप्रमाणे प्रल्हादबुवांनी आपले मनोगत पांडुरंगाला सांगितले आणि दुसऱ्याच दिवशी प्रस्थान ठेवले. ज्ञानेश्वरांचे चिंतन करीत ते आळंदीत आले. मार्गशीर्ष महिना चालू होता. अत्यंत पवित्र महिना. ते ज्ञानेश्वर महाराजांकडे आले. आळंदी येथे ज्ञानेश्वरांचे एक भक्त होते. प्रसादे हें त्यांचे नाव. नेहमी पंढरपूरला जाण्याने प्रल्हादबुवाचे नाव आणि कीर्ति त्यांनी ऐकली होती. प्रल्हादबुवा स्नान करून मंदिरात येत असतां त्यांना प्रसादे भेटले. प्रसाद्यांनीं त्यांना ओळखले. ते समोर जाऊन त्यांना म्हणाले,

नमस्कार!

नमस्कार, प्रल्हादबुवा म्हणाले.

मी प्रसादे आपले नाव आणि कीर्ति मी ऐकली आहे. आपण माझ्याकडे आल्यास आपले स्वागत करताना मला आनंद वाटेल.

मी या ठिकाणी एका विशेष उद्देशाने आलो आहे. काही महिने राहावे लागेल.

वा! वा! आपल्या संगतीचा लाभ मिळेल आणि मला कृतार्थ होता येईल. आपण निःसंकोचपणे माझ्याकडेच यावे.

ठीक आहे ज्ञानेश्वर महाराजांची इच्छा!

मी दुपारी आपणास घेण्यासाठी मंदिरात येतो तोपर्यंत आपले आन्हिक उरकलेले असेल.

ठीक आहे असे म्हणून प्रल्हादबुवा ज्ञानेश्वर मंदिराकडे वळले आणि प्रसादे आपल्या घरी गेले.

प्रल्हादबुवा ज्ञानेश्वर मंदिरात आले. ज्ञानेश्वर महाराजांच्या समाधीची त्यांनी यथासांग पूजा केली. त्यांच्यासमोर हात जोडून ते उभे राहिले आणि म्हणाले, महाराज आपण स्वप्नी आदेश दिल्याप्रमाणे आपल्या पायाशी आलो आहे. ज्ञानेश्वरीचे लेखन करताना आपली कृपा सतत लाभावी.

प्रार्थना संपली. दौत-लेखणी आणि कागद घेवून ते अजानवृक्षाजवळ आले. वृक्षाच्या तळाशी पूर्वेकडे तोंड करून बसले. ज्ञानेश्वर महाराजांना नमस्कार केला आणि त्यांनी लेखनास प्रारंभ केला.ॐ **नमोजी आद्या** ।

ठरल्याप्रमाणे दुपारी प्रसादे नैवेद्य घेवून आले. ज्ञानेश्वर महाराजांना नैवेद्य समर्पण करून ते प्रल्हादबुवांजवळ आले. त्यांची लेखणी कुरु कुरु वाजत होती आणि त्यातून मोत्यासारखी अक्षरे कागदावर उमटत होती. प्रसाद्यांनी ते पाहिले आणि ते तेथेच थबकले. प्रसादबुवांची जणु समाधी लाभली होती. लेखणी शाईत बुडविण्यासाठी त्यांनी कागदावरचा आपला हात बाजूला केला तेव्हा प्रसादे त्यांची लेखनसमाधी भंग करीत म्हणाले, नैवेद्य झाला आपण येणार ना!

होय, प्रल्हादबुवांनी लेखन आवरले, ज्ञानेश्वरीची पोथी आणि लेखन साहित्य बरोबर घेवून ते प्रसाद्यांच्या घरी आले. जेवणाची सिद्धता झाली होती. गप्पा करीत जेवणे झाली. संतुष्ट मनाने हात धुवून ते दोघेही ओटीवर आले. प्रल्हादबुवा म्हणाले, तुम्ही आळंदीत राहून ज्ञानेश्वर महाराजांची सेवा करीत आयुष्य वेचता तुम्ही खरंच भाग्यवान आहात.

पूर्व जन्मी हातून काही संत सेवा घडली असावी त्यामुळेच या ठिकाणी जन्माला येवून ज्ञानेश्वर महाराजांची सेवा करण्याची संधि लाभली. आपल्यासारखे विद्वान आणि संत येथे येतात. त्याच्या सेवेत मला अतिशय आनंद वाटतो, असे प्रसादे उत्तरले. त्यावर प्रल्हादबुवा म्हणाले, ज्ञानेश्वरी हा अमोलिक ग्रंथ आहे. त्याची प्रत करून घेण्याच्या इच्छेने मी येथे आलो आपला आश्रय लाभला यातच सर्व आले मला खात्री आहे माझे लेखन निर्विघ्नपणे पार पडेल.

दुपारी वामकुक्षी करून प्रल्हादबुवा पुन्हा मंदिरात गेले. आपल्या जागेवर बसून त्यांनी ज्ञानेश्वरी लेखनास प्रारंभ केला. सूर्य पश्चिम क्षितिजावर उतरला तेव्हा त्यांनी आपले लेखन थांबविले.

याप्रमाणे फाल्गुन महिन्यांत त्यांनी आपले लेखन संपविले. अपेक्षेपेक्षा फारच लवकर त्यांचे लेखन संपले होते. त्यांना आपली स्वलिखित पोथी हाती घेताना केवढा तरी आनंद वाटत होता. पोथी घेऊन ते ज्ञानेश्वरांच्या समाधीजवळ आले. पोथी त्यांच्यासमोर ठेविली. समाधीवरील तुळशीपत्रे काढून त्यांनी पोथीवर ठेविली. मस्तक टेकले आणि साश्रू नयनांनी ते ज्ञानदेवांना म्हणाले, महाराज आपण लेखनकार्य पूर्ण करून घेतलेत आंता आपण मला निरोप द्यावा. पांडुरंगाच्या भेटीची माझी तळमळ वाढू लागली आहे. त्यांनी ती पोथी एका वस्त्रात नीट गुंडाळली आणि मस्तकी धारण करून प्रसाद्यांच्या घरी आले. प्रसाद्यांनी या पोथीची पूजा केली. प्रसादबुवांना वस्त्र श्रीफळ देऊन सत्कार केला. नंतर दुसऱ्या दिवशी सर्वांचा निरोप घेवून पांडुरंग आणि ज्ञानेश्वर महाराज यांचे चिंतन करीत त्यांनी आळंदी सोडली आणि ते पंढरीच्या वाटेला लागले.

## गागाभट्ट भेट

शिवाजी महाराजांनी वयाच्या सोळाव्या वर्षी स्वराज्याचे तोरण बांधले आणि वयाच्या चव्वेचाळीसाव्या वर्षी ते छत्रपती झाले. यानिमित्ताने शके १५९६ च्या प्रारंभी काशीक्षेत्रीचे महान विद्वान गागाभट्ट पुण्यास आले होते.

महाराजांनी राज्यारोहणाच्या निमित्ताने ज्या विद्वान ब्राह्मणांना रायगडावर पाचारण केले होते त्यामध्ये प्रल्हादबुवा होते.*

गागाभट्ट हे मूळचे पैठणचे हे देशस्थ ऋग्वेदी ब्राह्मण गागाभट्टांचे अगोदर त्यांचे आठवे पुरुष वेदाभ्यासाठी काशीत आले आणि तेथेच स्थायिक झाले. गागाभट्टाचे वडील दिवाकरभट्ट महान विद्वान आणि ईश्वरीभक्त होते. उत्तरेतील सर्व शाखेचे ब्राह्मण त्यांना अतिशय मान देत असत. दिवाकर भट्टाचे पुत्र विश्वेश्वर. वडील कौतुकाने त्यांना 'गागा' म्हणत असत. तेव्हापासून विश्वेश्वरभट्ट गागाभट्ट म्हणून प्रसिद्धी पावले. गागाभट्टानी अनेक संस्कृत ग्रंथ लिहिले त्यामुळे त्यांची कीर्ति सर्वत्र पसरली असा महापुरुष महाराष्ट्रात आला आहे हे ज्यावेळी प्रल्हादबुवांना समजले तेव्हा तर त्यांना खूपच आनंद वाटला. त्यांना भेटण्याची संधी अनायासे चालून आली होती परंतु प्रल्हादबुवांना मात्र रायगडावर जाता आले नाही?

ज्येष्ठ शु १३ शके १५९६ शनिवार रोजी छत्रपती शिवाजी महाराजांचा राज्याभिषेक सोहळा झांला. आलेले सर्व लोक आपापल्या गावी परतू लागले. शेतकऱ्यांनी रोहिणी नक्षत्रावर पेरण्या केल्या आणि मृगाच्या सरीची ते वाट पाहू लागले. त्यावेळी पंढरपूरसारख्या क्षेत्री जाण्याचा आपला मनोदय गागाभट्टांनी छत्रपतींना सांगितला. तेव्हा छत्रपतींनी आपले प्रधान रघुनाथ पंडित यांच्याबरोबर त्यांची पाठवणी केली. ते पंढरपूर येथे येत असल्याचे कळल्यावर तेथील ब्रह्मवृंदाला अतीव आनंद वाटला. ते पंढरपुरीं येताच सीमेवरच त्यांचे सर्वांनी स्वागत केले. सुहासिनींनीं पंचारती ओवाळल्या. पालखीतून त्यांना गावात आणण्यात आले. त्यांच्याबरोबर काशीतील अन्य विद्वान ब्राह्मणही होते. पांडुरंगाचे दर्शन होताच सर्वांना अतीशय आनंद झाला. गागाभट्ट म्हणाले, उत्तरेत, तिकडे आमचे देव म्लेच्छ तोडून उध्वस्त करीत आहेत. स्नानसंध्या करायला उदक भरपूर पण त्यामध्ये केंव्हा आणि कसे विघ्न येईल ते मात्र सांगता येत नाही. इथे आता शिवाजीराजा झाला त्यांच्या पराक्रमामुळे इकडे आता कोणीं वक्र दृष्टी करून पाहणार नाही. वेदांचे अध्ययन आणि अद्वैत वेदान्ताचा प्रसार करण्यास येथे योग्य वेळ आली आहे.

* (टीप :. शिवाजीमहाराचे प्रल्हादबुवांना आलेले राज्याभिषेकाचे निमंत्रण बडवे मंडळीनी जपून ठेवले होते. इतिहास संशोधक कै. द. वा. पोतदार यांनी पंढरपूर भेटीत ते मागून घेतले व पुण्यास नेले त्यानंतर ते निमंत्रण बेपत्ता आहे.)

त्यांचे भाषण ऐकून प्रल्हादबुवा म्हणाले, धर्ममार्तंड म्हणतात ते खरे आहे. पंढरपूर हे अद्वैत वेदान्ताचे मूळपीठ आहे येथील सन्तांनी गेल्या चारशे वर्षांत केवळ अद्वैत वेदान्ताचाच प्रसार केला. भक्तीची पेठ त्यांच्यामुळे बहरली. आपल्या आगमनाने या पेठेला अधिक महत्त्व प्राप्त झाले.

गागाभट्टांच्या बरोबर आलेले ब्राह्मण यांना वाटत होते की काशी हे सर्व विद्यांचे पीठ असता येथील ब्राह्मण पंढरपूरला अद्वैत वेदान्ताचे पीठ म्हणतात हे कसे? त्यांच्या मनातील ही शंका विद्याधरशास्त्री उपाध्याय यांनी विचारली ते म्हणाले, श्रीमत् शंकराचार्यांचे ब्रह्मसूत्र म्हणजे अद्वैत वेदान्ताचा मेरुमणि. तसा ग्रंथ झाला नाही आणि पुढे होणार नाही.

हे ऐकताच प्रल्हादबुवा एकदम म्हणाले, शास्त्रीबुवांची काही चूक होते आहे. या ग्रंथाच्या तोडीस तोड असा ग्रंथ ज्ञानेश्वर महाराजांनी लिहून आमच्यावर महान उपकार केले आहेत. या ग्रंथाला **'अम्रतानुभव'** असे म्हणतात, असे या ग्रंथांत आहे तरी काय? शास्त्रीबुवांनी आश्चर्यचकित कुतुहलाने विचारले. शास्त्रीबुवा! ज्ञानदेव तु कैवल्यम् हा आचार्यांचा महान सिद्धांत पण ज्ञानेश्वर महाराजांनी परमेश्वरं प्राप्तीसाठी ज्ञानसुद्धा नाहीसें झाले पाहिजे असे म्हणून ज्ञानखंडन केले आहे. आचार्य मायेला स्थान देऊन पुरुषांपेक्षा ती गौण असल्याचे सांगतात पण ज्ञानेश्वर महाराज पुरुष आणि प्रकृती दोन्ही कृती म्हणजे एकाच परमेश्वराचा विलास असून देवोदेवी म्हणून दोघांनाही समान मानतात. वेदान्तामध्ये वादाला स्थान आहे पण भक्तीमध्ये भेदाला आणि वादाला मुळीच स्थान नाही.

प्रल्हादबुवांचे हे निश्चयात्मक भाषण ऐकताच तेथील सर्व पंडित अवाक् झाले तेव्हा विद्याधरशास्त्री म्हणाले, असे असेल तर आम्हाला हा ग्रंथ अवलोकन केलाच पाहिजे.

विद्याधरशास्त्रांची इच्छा लक्षात घेवून प्रल्हादबुवांनी आपल्या घरुन अनुभवामृताची पोथी आणविली आणि उघडून शास्त्रीबुवांच्यासमोर ठेविली.

शास्त्रीबुवांनी पोथीचे पहिले पान उघडले आणि ते वाचू लागले -

यदक्षरमनाख्येयमानंदमजमव्ययम्।
श्रीमन्निवृत्तिनाथेति ख्यातं दैवतमाश्रये॥१॥
गुरुरित्याख्यया लोके साक्षाद्विद्या हि शांकरी।
जयत्याज्ञा नमस्तस्यै दयार्द्रायै निरन्तरम्॥२॥
सार्धं केन च कस्यार्धं शिवयोः समरूपिणोः।
ज्ञातुं न शक्यते लग्नमिति द्वैतच्छलान्मुहुः॥३॥
अद्वैतमात्मनस्तत्वं दर्शयन्तौ मिथस्तराम्।
तौ वन्दे जगतामाद्यौ तयोस्तत्त्वाभिपत्तये॥४॥
मूलायाग्राय मध्याय मूलमध्याग्रमूर्तये।
क्षीणाग्रमूलमध्याय नमः पूर्णाय शंभवे॥५॥ (अमृतानुभव)

ज्ञानेश्वर महाराजांचे हे संस्कृत काव्य वाचून विद्याधरशास्त्री प्रसन्न झाले पुढे त्यांनी अडखळत **'ऐसी इथे तिरुपाधिके। जगाची जिये अनेका। तिथे वन्दिली मिया मूळिकें। देवोदेवी॥'** ही ओवी वाचली त्यांना त्या ओवीचा अर्थ लागेना। ते पुन्हा पुन्हा ती ओवी वाचू लागले पण अर्थ कळेना. बाहेर सूर्यास्त होत होता. तेव्हा प्रल्हादबुवांनी सर्व पाहुण्यांना विनंती केली की त्यांनी आपल्याकडे यावे. प्रल्हादबुवांचे ज्येष्ठ पुत्र रामचन्द्र आणि द्वितीय चिरंजीव कृष्णदास यांनी सर्वांना वन्दन केले. तेव्हा गागाभट्ट म्हणाले, तुमच्या ग्रंथाची भाषा आम्हाला परिचित नाही.

तेव्हा प्रल्हादबुवा म्हणाले, पंडितांना आवडत असेत तर तो ग्रंथ मी देवभाषेतून सांगेन. आपण तो जरूर ऐकावा.

## अमृतानुभवाची संस्कृत समश्लोकी

गागाभट्ट आणि विद्याधरशास्त्री यांनी प्रल्हादबुवांच्या म्हणण्याला संम्मती दिली. मग प्रल्हादबुवांनी ठरविले आपण ह्या ग्रंथाचे भाषांतर करून या मंडळींना सांगावे. रात्री सर्वजण झोपल्यावर प्रल्हादबुवांनी अमृतानुभवाची पोथी

उघडली. एक एक ओवी वाचावी आणि त्याचे संस्कृत रुपांतर करावे असा क्रम चालू झाला. या कार्यांत किती वेळ निघून गेला त्याचे भानही राहिले नाही.

दुपारी भोजनोत्तर विश्रांती झाली पंढरपुरातील सर्व प्रतिष्ठित मंडळीही जमली. गागाभट्ट उच्चासनावर बसले. त्यांच्या बाजूला विद्याधरशास्त्री आणि अन्य पंडितवर स्थानपन्न झाले. प्रल्हादबुवांचे पुत्रही या सभेत सामील झाले. गागाभट्ट वगैरे वैदिकांनी वैदिक प्रार्थना म्हंटली-

**ॐ भद्रं कर्णेभिः शृणुयाम देवाः।**
**भद्रं पश्येमाक्षभिर्यजत्राः।**
**स्थिरैरंगैस्तुष्टुवांसस्तनूभिः।**
**व्यशेय देवहितं यदायुः॥**
**ॐ शान्तिः शान्तिः शान्तिः**

प्रल्हादबुवांनी पोथीला नमस्कार केला आणि ते वाचू लागले

**ऐसी इये निरुपाधिकें। जगाची जिथे कनकें।**
**तिथे वन्दिली मियां मूळिके। देवोदेवी॥१॥**

ज्ञानेश्वर महाराज म्हणतात-

**एवं यज्जगतां मूल जनकं निरुपाधिकम्।**
**शिवशक्त्यात्मकं द्वन्द्वं वन्दितं तन्मया मुदा॥१॥**

असे त्या ओवीचे संस्कृत भाषांतर त्यांनी सांगितले विद्याधरशास्त्री कान देऊन ऐकत होते. संस्कृत भाष्य ऐकून ते अतिशय संतुष्ट झाले. भाषांतर सांगून होताच त्यांनी गागाभट्टांकडे आणि विद्याधरशास्त्रींकडे पाहिले त्यांच्या समाधानाच्या स्मितरेषा पाहून प्रल्हादबुवांना अधिकच स्फूर्ति आली याप्रमाणे अमृतानुभवाच्या सातशे आठ ओव्या संस्कृतमध्ये कथन केल्यानंतर काशीपती पंडित आश्चर्याने चकित झाले. काय म्हणावे ते त्यांना सुचेना. वाहवा! वाहवा!! एवढेच शब्द त्यांच्या मुखातून बाहेर पडत होते. अखेर विद्याधरशास्त्री म्हणाले, तुम्ही म्हणता त्याप्रमाणे हा ग्रंथ महान आहे. वेदान्ताचे प्रतिपादन करताना भक्तीचा गंध कायम ठेवण्याचे ज्ञानेश्वर महाराजांचे

कौशल्य वाखाणण्याजोगे आहे. पोथी वाचून झाल्यावर ती एका चौरंगावर ठेऊन तिची काशीच्या पंडितांनी पूजा केली. प्रल्हादबुवा आनंदाश्रूंनी भरलेल्या नेत्रांनी हे पाहात होते. पुढे काशीकर पंडितांनी शाल आणि धन प्रदान करून प्रल्हादबुवांचा आदर केला.

काशीचे पंडित निघून गेल्यावर प्रल्हादबुवांनी आपण सांगितलेली संस्कृत टीका श्लोक रुपाने स्वतःचे अक्षरांत लिहून काढली. या त्यांच्या संस्कृत टीकेचे हे वैशिष्ट्य आहे की यामध्ये असलेल्या ज्ञानेश्वरांच्या ओव्या बाजूला केल्या तर आचार्यांनी हा एक प्रकरण ग्रंथ तर लिहिला नाही ना? असे वाटावे.*

## 'हे धन स्वराज्याकामी लावा''

काशीच्या पंडितांना मान डोलवायला लावणारा संस्कृत अमृतानुभव पूर्ण झाला. प्रल्हादबुवांना कृतार्थ वाटू लागले. पंढरपुरातील विद्वान तर प्रल्हादबुवांना मान देतच पण त्यांची कीर्ति ज्यावेळी परस्थ पोहोचली तेथील विद्वानांमध्ये सुद्धा प्रल्हादबुवांना मानाचे स्थान मिळू लागले. छत्रपती शिवाजी महाराजांचा राज्याभिषेक झाला. त्यानंतर बरोबर दहा दिवसांनी ज्येष्ठ वद्य नवमीच्या दिवशी जिजामाता परलोकवासी झाल्या. या सर्व दुःखावेगाने

* (टीप :लोकांना संस्कृत समजत नाही म्हणून ज्ञानदेवांनी गीतेसारख्या ग्रंथावर ज्ञानेश्वरी सारखा मराठी पद्यग्रंथ तयार केला. असे असता प्रल्हादबुवांनी मराठी ओव्या संस्कृत करण्याचे प्रयोजन काय? असा विचार विद्वानांच्या मनात येणे अगदी शक्य आहे याचे उत्तर असे आहे की ज्या परप्रांतीयांना मराठी येत नाही त्यांच्यासाठी हा प्रयत्न आहे. तसे पाहिले तर मराठी भाषा सोपी नाही. त्यातल्या त्यात ज्ञानदेवांची मराठी भाषा तर जुन्या वळणाची आहे. सामान्य मराठी माणसाला सुद्धा ती भाषा कळणे कठीण जाते. परंतु वेदान्त या विषयावरील सर्व ग्रंथ संस्कृत भाषेत आहेत. भारतात संस्कृत भाषा विद्वानांच्या मुखी आहे. मराठी समजले नाही तरी संस्कृत निश्चित समजेल असे त्यावेळचे वैदिक परिसराचे चित्र होते. त्यामुळे प्रल्हादबुवांनी हे महान कार्य केले. अमृतानुभावरील हे संस्कृत रुपान्तर उत्तर भारतात सुद्धा मान्यतेला पोहोचलेले आहे. ज्ञानेश्वरीच्या बाबतीत सुद्धा श्री महादेव पांडुरंग ओक नावाच्या रायगड तालुक्यातील महाड येथे राहणाऱ्या संस्कृत पंडिताने ज्ञानेश्वरीच्या पहिल्या सहा अध्यायाचा संस्कृत भाषांतर केले आहे.)

महाराज खरे तर बेचैन झाले होते. ज्या वैदिकांना राज्याभिषेकासाठी आमंत्रणे पाठविली होती आणि जे उपस्थित राहू शकले नाहीत त्यांना महावस्त्र आणि दक्षणा पाठवून त्यांचा सत्कार करण्यासाठी महाराजांनी रघुनाथपंडितांना मुद्दाम सांगितले होते त्याप्रमाणे रघुनाथ पंडित पंढरपूरात आले. प्रल्हादबुवांच्या घरी गेले त्यांच्याबरोबर राजसेवक होते. त्यांच्या हाती वस्त्राछिद तबके होती. प्रल्हादबुवा लिहित होते या महान राजपंडिताला पाहताच ते उठले. या म्हणत मी काय सेवा करू? हे त्यांचे बोल एकताच रघुनाथ पंडितांनी आपल्या सेवकांना आज्ञा केली. सेवक आत आले बरोबर आणलेली दोन्ही तबके प्रल्हादबुवांच्या समोर ठेवीत त्यांना मुजरा करून ते सेवक बाहेर गेले तेव्हा रघुनाथपंडित बोलू लागले.

क्षत्रिय कुलावंतस राजे शिवाजी महाराज यांच्या अभिषेकाच्या वेळी आपण येवू शकला नाहीत. राजांनी विद्वानांचा सत्कार केला. आपण नसल्याने छत्रपतीनी आपणासाठी हे सर्व पाठविले असून आपणास शतवंदने सांगितली आहेत, असे म्हणत रघुनाथ पंडितांनी तबकावरील प्रावरण स्वतःच्या हाताने दूर केले. ते दिव्य वस्त्र आणि धन पाहून प्रल्हादबुवांनी नमस्कार केला आणि म्हणाले, महाराजांना आमचे नमस्कार सांगा आणि सांगा की तुमचे धन आम्हाला पावले, आम्ही संतुष्ट झालो पण हे धन आपण स्वराज्याच्या कामी लावा.

प्रल्हादबुवांनी ते धनाचे तबक हाताने उचलले. ते मस्तकी टेकले आणि रघुनाथ पंडितांच्या हाती देऊन त्यांना नमस्कार केला. रघुनाथ पंडिताचे हृदय भरुन आले ते म्हणाले, आपल्या स्पर्शाने पवित्र झालेले हे धन स्वराज्याचे साम्राज्य आणि सुराज्य करील यात शंका नाही. प्रल्हादबुवा आणखी काही बोलणार तोच रघुनाथपंडित उठले. दुसऱ्या तबकांतील महावस्त्र (भरजरी शाल) हाती घेतले आणि घडी मोडून प्रल्हादबुवांच्या अंगावर घातले ते पाहून प्रल्हादबुवा म्हणाले, 'महावस्त्र! नव्हे!! नव्हे!! हे राजवस्त्र म्हणजे धर्मरक्षण आहे आम्ही आता निर्भयपणे धर्मरत राहू'.

प्रल्हादबुवांच्या या सर्व कृतींचा रघुनाथ पंडितावर मोठा परिणाम झाला त्यांच्या मनात प्रल्हादबुवांबद्दल आदर होताच त्याची महान वृद्धि झाली. त्यांच्या पायावर आपले मस्तक नम्र करीत रघुनाथ पंडितांनी त्यांचा निरोप घेतला.

## रक्षति रक्षतः

शके १६०२ (इ.स. १६८०)चे रौद्र संवत्सर सुरू झाले ते खरेच रौद्र रूप धारण करून. हे नवे संवत्सर सुरू झाले अन् १५ दिवसांनीच चैत्र शुद्ध पौर्णिमेच्या शनिवारी छत्रपती शिवरायाची जीवन ज्योत मालवून अवघे मराठी स्वराज्य शोकाच्या काळोखात बुडाले. या घटनेने दिल्ली दरबारास मात्र असुरी आनंद झाला. बादशहा औरंगजेब निहायत खूष झाला. आता दक्षिणभारत पादाक्रांत करण्याचे आपले स्वप्न सत्य ठरणार याची त्याला शाश्वती वाटू लागली व त्यासाठी स्वतःच दक्षिणेत जायचे त्याने ठरविले.

बलाढ्य फौजेसह अलमगीर औरंगजेब दक्षिणेत आला पण महाराष्ट्राचा मुलुख काबिज करणे वाटले एवढे सोपे नाही हे त्याला कळून चुकले. पण आता कोणत्याही परिस्थितीत दक्षिणभारतावर कब्जा केल्याशिवाय दिल्लीस जायचे नाही असे त्याने ठरवून महाराष्ट्रातच तो तळ ठोकून बसला. इ.स. १६८९ मध्ये त्याने छत्रपती संभाजीचा छळ करून वध केला. तरीही महाराष्ट्र मुलुख जिंकण्यास त्यास म्हणावे असे यश आले नाही.

पंढरपूरच्या जवळील मंगळवेढ्यानजीक भीमा नदीच्या काठावरील ब्रह्मपुरी येथे औरंगजेबाचा लष्करी तळ पडला. पंढरपूरच्या विठ्ठल मंदिरावर त्याचा हल्ला होणार हे पंढरपुरकरांनी जाणले आणि आता विठ्ठलमूर्तीचे रक्षण करणे महत्त्वाचे आहे हे लक्षात घेऊन बडवे समाजातील प्रमुख मंडळींनी पुढाकार घेऊन प्रल्हादबुवाच्या प्रमुखत्वाखाली सर्व गावकऱ्यांची बैठक घेतली. अफजलखानाच्या संकटकाळी प्रल्हादबुवांनी धैर्याने विठ्ठलमूर्तीचे रक्षण केले ते लक्षात घेऊन सर्वांनी पुनःश्च ही जबाबदारी प्रल्हादबुवांवर सोपविली. बैठक संपली. रात्रीच्या नीरव अंधारात सारेजण आपापल्या घरी गेले. नित्यनेमाप्रमाणे रात्रीच्या शेजारतीस प्रल्हादबुवा मंदिरात आले. 'विठ्ठला! साऱ्या प्राणीमात्राचा तू रक्षणकर्ता, अन् आज तुझे रक्षण करण्याचे कार्य माझ्या सारख्या पामरावर आलेले आहे. कालाय तस्मै नमः! माझ्या हातून तूच तुझे रक्षण करून घे' असे म्हणत प्रल्हादबुवांनी विठ्ठलाकडे साश्रू नयनांनी करुणा भाकली. उदास अशा

विमनस्क अवस्थेतच ते मंदिरातून घरी आले. विठ्ठलमूर्ती रक्षणाच्या चिंतेने त्यांना रात्रभर डोळा लागला नाही. पण पहाटेपूर्वी त्यांचा निर्णय झाला होता. पहाटे ते एका नव्या आत्मविश्वासाने नित्य कर्मास लागले.

रात्री शेजारतीच्या वेळी कधी नव्हे एवढी स्थानिक मंडळींची मंदिरात गर्दी दाटलेली होती. कोणीच कोणाशी फारसे बोलत नव्हते. यानंतर विठ्ठलमूर्तीचे दर्शनास आपण अंतरणार, पुन्हा केव्हा होईल ते अनिश्चित. या विचाराने अखेरचे दर्शन घेण्यास सारेजण आलेले होते. नेहमीपेक्षा थाटामाटाने पण साश्रूनयनांनी व जडअंतःकरणाने शेजारती पार पडली. पूर्वनियोजित चार पाच व्यक्ती आणि प्रल्हादबुवा सोडून बाकी सर्वजण विठ्ठलाचे दर्शन घेऊन आपापल्या घरी निघून गेले. प्रल्हादबुवांनी सदोबा बडवे, गोपाळराव बडवे, नरहर बडवे, धोंडू नाना बडवे, तुळशीराम बडवे आदींच्या सहकार्याने विठ्ठलमूर्ती जागेवरून हलविली आणि बैलगाडीत घालून पंढरपूरच्याच जवळ दोन कोसावरील देगाव येथे नेली. गावाबाहेरच गाडी थांबवून प्रल्हादबुवा व दोघेजण गावात पाटलाच्या वाड्यावर गेले. वाड्याच्या बाहेर बसलेल्या रामोशाने चौकशी करून मग पाटलास उठविले. प्रल्हादबुवा व पाटील यांच्यात हळू आवाजात बोलणे झाले अन् गावाच्या बाहेरील बाजूनेच बैलगाडी पाटलाच्या शेतावरील वस्तीवर नेण्यात आली. पाटलाच्या ताब्यात मूर्ती देऊन उदासमनाने प्रल्हादबुवा आपल्या सहकाऱ्यांसह पहाटेपूर्वी पंढरपुरात परतले.

पहाटे नेहमीप्रमाणे ते काकडारतीस गेले. गाभाऱ्यामध्ये मूर्ती नव्हती तरी सर्व उपचार-नित्यसोहळे नेहमीप्रमाणेच पार पाडायचे असे ठरले होते. कारण औरंगजेबाचे गुप्तहेर पंढरपूर मार्गेच येत जात होते. त्यांना या गोष्टीचा सुगावा लागू देता कामा नव्हते. संकट पूर्णपणे टळल्याची खात्री झाल्यावर विठ्ठलमूर्ती मंदिरात परत आणण्यात येईल असे प्रल्हादबुवांनी सर्वांना सांगितले पण ती कोठे दडवून ठेवली आहे त्याबाबत मात्र मौन पाळले.

देगावच्या पाटलांनी विठ्ठलमूर्ती रक्षणाचे कार्य स्वीकारून मोठीच जोखीम अंगावर घेतली होती. विठ्ठलमूर्ती आपल्याकडे आहे हे आपल्याकडील नोकर-चाकरांना देखील त्याने कळू दिले नव्हते. कधी बळदात, कधी कडब्याच्या गंजीत तर कधी विहिरीच्या कपारीत ठेवून मोठ्या दक्षतेने त्याने मूर्तीचे रक्षण केले. अवघ्या महाराष्ट्राच्या जीवाचा जीव, बडव्यांचे नीजधन असलेल्या मूर्तीचे रक्षण पाटलाने तळहातावरील फोडाइतके काळजीने व हुशारीने व पुरेशा

सावधानतेने केले.

मराठ्यांचे स्वराज्य नेस्तनाबूत करून दक्षिणभारत पादाक्रांत करण्यास आलेला औरंगजेब मराठ्यांच्या गनिमी काव्याने जेरीस आला. आता तो वृद्धही झाला होता. मराठ्यांशी निकराने संघर्ष करण्याची त्याची जिद्द-ईर्षा आतां मावळू लागली होती. अशा विकल मनस्थितीतच त्याने भीमा नदीकाठचा ब्रह्मपुरी येथील आपला तळ हलवून अहमदनगर भागात नेण्याचे ठरविले. अखेर इ.स. १६९९ मध्ये त्याने ब्रह्मपुरी येथील तळ उठविला व तो पंढरपुरी न जाता नगरकडे निघून गेला.

औरंगजेब नगरकडे निघून गेल्याची वार्ता ऐकून पंढरीनगरीत आनंदोत्सव साजरा करण्यात आला. विठ्ठलमूर्तीची पुनर्स्थापना करण्याच्या दृष्टीने विचार सुरू झाला. चांगला दिवस पाहून पुनर्स्थापना करण्याचे ठरले. त्यादृष्टीने प्रल्हादबुवा काही मंडळींना घेऊन देगावच्या पाटलाकडे गेले व आपला मनोदय कथन केला. पाटलासही आनंद झाला. मूर्तीचे रक्षण करून आपण फारमोठी जोखीम पार पाडलीत. आपले उपकार शद्बात वर्णन करता येणे शक्य नाही असे प्रल्हादबुवांनी पाटलास धन्यवाद दिले. त्यावर 'हे कार्य विठ्ठलानेच माझ्याकडून करवून घेतले आहे. त्यात धन्यवाद कसले! एवढी सेवा घडली ते भाग्यच म्हणायचे' असे पाटील सद्गतीत होऊन म्हणाले. पाहुणचार झाला. पाटलाने बैलगाडी सजविण्यास सांगितली. पूजेची तयारी केली.

विठ्ठलमूर्ती विहिरीच्या कपारीतून काढून वाड्यावर आणण्यात आली. पाटलाने पत्नीसह विठ्ठलमूर्तीची पूजा केली आणि ती प्रल्हादबुवांच्या स्वाधीन केली. देगावहून वाजत-गाजत मूर्ती पंढरीत आणण्यात आली. विठ्ठलमूर्तीच्या स्वागतार्थ अवघी पंढरीनगरी सुशोभित करण्यात आली होती. रस्त्याच्या दुतर्फा उभे राहून भाविकांनी पुष्पवृष्टी केली. कार्तिक शुद्ध प्रतिपदेच्या शुभदिनी म्हणजे दिवाळी पाडव्याच्या मुहूर्तावर विठ्ठलमूर्तीची मंदिरातील गाभाऱ्यात पुनर्स्थापना करण्यात आली.

*** (टीप : विठ्ठलमूर्ती परत देताना देगावच्या पाटलांनी पुढे भविष्यात काही त्रास उद्‌भवू नये म्हणून पंढरपुरातील प्रमुख व्यक्तींचे एक संमती पत्र व मूर्ती मिळाल्याची पोच पावती प्रल्हादबुवांकडे मागितली होती. त्यानुसार पंढरपुरातील प्रमुख मंडळीच्या सहीचे एक पत्र पाटलास देण्यात आले व विठ्ठलमूर्ती ताब्यात परत मिळाल्याची पावती प्रल्हादबुवा, गोपाळराव, नरहरी, सदोबा आदी बडव्यांनी लिहून दिली. या दोन ऐतिहासिक दस्तैवजांना भारत इतिहास संशोधन मंडळाच्या पत्रिकेतून प्रसिद्धी देण्यात आलेली असून जिज्ञासूंच्या माहितीसाठी हे दोन दस्तैवज या ग्रंथाशेवटी परिशिष्टात दिलेले आहेत.)**

# ज्ञानोबा-तुकाराम जयघोष

एके दिवशी सकाळी प्रल्हादबुवा पत्नीला म्हणाले, ऐकलं का! मी मंगळवेढ्याला चाललो आहे. संध्याकाळपर्यंत परत येतो.

तिचा निरोप घेऊन ते निघाले आणि मंगळवेढे येथे आले. वेशीजवळ येताच त्यांना चोखामेळा, दामाजीपंत आणि कान्होपात्रा यांची प्रकर्षाने आठवण झाली. त्यांच्या भूमीला वंदन करून त्यांनी गावात प्रवेश केला. तेथे एक पंडित राहत होते. त्यांच्याकडे ते गेले. त्यांनी त्यांचे उत्तम स्वागत केले. त्यांच्याजवळ वेदचर्चा केली. दुपारी भोजन झाले. विहित कार्य व विश्रांती झाली. तेव्हा प्रल्हादबुवा म्हणाले, आम्ही निघतो आता. पंढरपूरला आलात तर घराला पाय लावून जावं. मी आपली वाट पाहातो. त्या पंडितांचा निरोप घेऊन प्रल्हादबुवा निघाले. सूर्यास्तापूर्वी पंढरपूरला पोहोचण्याच्या इराद्याने त्यांनी बैलगाडी झपाट्याने हाकण्यास सांगितली. कारण नेहमीप्रमाणे कीर्तन आणि शेजारती करून पांडुरंगाचा निरोप घ्यायचा आणि घरी यायचं असा त्यांचा नेहमीचा कार्यक्रम होता. त्यामध्ये अंतर पडू नये म्हणून ते त्वरेने निघाले होते.

काही थोडे अंतर चालून झाले तो आकाश काळ्याकुट्ट मेघांनी आच्छादून गेले. काळोख वाटू लागला. वारा सुटला आणि लगेच पावसाला सुरुवात झाली. प्रथम थोडा गारवा बरा वाटला. पण नंतर मात्र पावसाला जोरात सुरुवात झाली. विजा चमकत होत्या. गडगडणे जोरात चालू होते आणि पावसाचा जोरही खूप वाढला. किती वेळ गेला ते कळत नव्हते. काळोख दाटून अधिकाधिक गडद होत होता. पाऊस थांबण्याचे चिह्न दिसत नव्हते. त्यांनी गीतापाठ करण्यास प्रारंभ केला. थोडावेळ गेला. आकाशातील मेघ विरळ होऊ लागले आणि थोड्याच वेळात पाऊसही थांबला. किती रात्र झाली ते समजण्यास मार्ग नव्हता. पंढरपूरच्या अलीकडे गोपाळपूरजवळील पुष्पावती नदी दुथडी भरून वाहात होती. पाण्याला खूप ओढ होती. नदीत पाऊल टाकण्याची सोय नव्हती. पुढे जाण्याचे सर्व प्रयत्न फोल ठरले होते.

मनात पांडुरंगाची प्रार्थना चालू होती. देवा! आज कीर्तन अंतरले आणि तुझे दर्शनही अंतरले. इतक्या वर्षात आजच तू माझ्यावर असा रुष्ट का झालास? त्यांच्या तळमळीला पांडुरंगाचा प्रतिसाद मिळत नव्हता. मन बैचेन झाले होते. ते अधिक बेचैन होऊ लागले. पण पुढचा मार्ग दृष्टीपथात येत नव्हता. नदीचे पाणी ओसरले. प्रल्हादबुवांना आनंद झाला. त्यांनी नदी ओलांडली आणि मध्यरात्रीच्या सुमारास ते घरी पोहोचले. देवाजवळ निरांजन तेवत ठेवून त्यांची पत्नी आणि मुले वाट पहात होती. प्रल्हादबुवा घरी येताच त्या सर्वांना हायसे वाटले. ओल्या वस्त्रांनीच ते घरी आले होते. अंगावरील कपडे काढीत असता पत्नी म्हणाली, खूप दमणं झालंय. चार घास खाऊन घ्या.

थांब! मी स्नान करतो. पांडुरंगाचे दर्शन घेऊन येतो आणि मग जेवतो.

प्रल्हादबुवांनी स्नान केले. दुसरी वस्त्रे परिधान केली आणि पत्नीला म्हणाले, तुम्ही जेवणाची तयारी करा. मी दर्शन घेऊन आलोच. प्रल्हादबुवा असे बोलून बाहेर पडले. पत्नीने पाट मांडला. पुढे ताट ठेवले. पाण्याचा तांब्या भरून ठेवला. समईची वात सरशी केली आणि त्या समईच्या प्रकाशातच ती पतीची वाट बघत थांबली.

प्रल्हादबुवा घरातून निघाले तेव्हा पहाट होत आली होती. जवळजवळ काकडआरतीची वेळ आली होती. अजून देवळाची दारे उघडलेली नव्हती. दरवाजाला असलेल्या गोल छिद्रातून ते पाहू लागले. पण त्यांना समोर पांडुरंग दिसेनात. त्यांना वाटले, आपल्या डोळ्यांना काहीतरी झाले आहे. त्यांनी धोतराच्या सोग्याने डोळे पुसले. टाचा वर करून पुन्हा पाहू लागले. परंतु त्यांना समोर पांडुरंग दिसेनात. आणखी सूक्ष्मपणे पाहताना त्यांना पांडुरंगाच्या पायाखालची वीट दिसली पण त्या विटेवर पांडुरंग दिसेनात. त्यांना आश्चर्य वाटले. त्यांनी पुन्हा पुन्हा पाहाण्याचा प्रयत्न केला. पण त्या विटेशिवाय त्यांना अन्य काहीच दिसत नव्हते. त्यांच्या तोंडाला कोरड पडली. अंगाला घाम सुटला. नेत्रातून अश्रू वाहू लागले. ते म्हणाले देवा माझ्या हातून असे कोणते पाप घडले म्हणून तुझे दर्शन मला पारखे झाले. पांडुरंगा मला क्षमा कर. पण तुझे दर्शन मला घडू दे. देवा तुझे दर्शन नाही म्हणून माझा जीव केव्हापासून कासावीस झाला आहे. त्यांनी पुन्हा आपले नेत्र पुसले. त्या भोकातून त्या रिकाम्या विटेकडे पाहाण्यात त्यांचा काही वेळ गेला. ते आता खूपच अस्वस्थ

झाले होते. तोच गाभाऱ्यात कोणी तरी भजन करीत असल्याचा अगदी बारीकसा आवाज त्यांच्या कानी आला. त्यांनी कान टवकारले. पण आवाज स्पष्टपणे येत नव्हता. यावेळी आत कोण बरे भजन करीत असावा? देवळाचे दरवाजे लावताना आत कोणी अडकून तर पडला नाही? त्यांनी त्या नादाकडे लक्ष देण्यास सुरुवात केली आणि त्याचवेळी त्यांचे डोळे आत कोणी अडकला आहे याचा शोध घेत घेऊ लागले. टाचा उंचावून पाहताना त्यांना पांडुरंगाचा रत्नजडीत मुकुट खाली पडलेला दिसला. ते अधिक उत्सुकतेने पाहू लागले. त्यांना मनात निरनिराळे विचार येऊ लागले. ते आणखीनच भयभीत झाले. त्या मुकुटाकडे पाहात असतानाच चिपळ्यांचा आवाज अधिक स्पष्ट होऊ लागला. त्यांची उत्सुकता वाढली. हळू हळू शद्ब ऐकू येऊ लागले. ते तसेच पहात राहिले. थोडा वेळ गेला आणि त्यांच्या कानी **'ज्ञानोबा-तुकाराम' 'ज्ञानोबा-तुकाराम'** असा ध्वनि पडला. पाठोपाठ पांडुरंगही दिसले. पांडुरंगाचा पितांबर घामाने भिजला होता. कमरेला बांधलेला शेला थोडा सैल झाला होता. केस पाठीवर अस्ताव्यस्त धिंगाणा घालत होते. डोळ्यातून पाणी पाझरत होते. दोन्ही हात उंचावून देव चिपळ्यांचा नाद करीत होते. त्यांना जगाचं भान नव्हतं. प्रल्हादबुवांनी ते पाहिले आणि त्यांचे भान हरपले. त्यांनी पण आपले हात उंचावले. हातात चिपळ्या घेतल्याप्रमाणे बोटांची हालचाल करीत मुखाने **'ज्ञानोबा-तुकाराम'-'ज्ञानोबा-तुकाराम'** म्हणत बेभान होऊन नाचू लागले.

पहाटे कोंबडा आरवला. काकड आरतीला भक्तगण येतील म्हणून पांडुरंग आपल्या विटेवर जाऊन कटी हात ठेवून विसावले. परंतु प्रल्हादबुवांना मात्र त्याची शुद्ध नव्हती. काकड आरतीला लोक येऊ लागले. त्यांनी प्रल्हादबुवांना दरवाजात असे नाचताना पाहिले. लोकांना काय होत आहे अगर झाले आहे याची दाद नव्हती. त्याप्रमाणे डोळे मिटल्यामुळे आलेल्या लोकांना देखील त्यांनी पाहिले नाही. अखेर एक जण पुढे झाला. त्याने प्रल्हादबुवांना हाका मारून जागे करण्याचा प्रयत्न केला; पण तो फुकट गेला. तेव्हा दुसऱ्या एकाने त्यांना दंडाला धरून हलविले. प्रल्हादबुवा म्हणून हाका मारायला सुरुवात केली. तेव्हा बुवांचे उंचावलेले हात खाली आले. नाचणे थांबले. त्यांनी डोळे उघडून लोकांकडे पाहिले आणि ते ओक्साबोक्शी रडू लागले. त्यांच्या रडण्याचे कारण कोणालाच कळेना. लोकांकडे पाहून ते अगदी वैतागाने म्हणाले, अरे तुम्ही मला का जागे केलेत. केवढ्या आनंदात मी होतो.

माझा हा आनंद हिरावून घेऊन माझ्याकडे असे निष्ठूरपणाने आणि आश्चर्याने काय बघत आहात. कसं सांगू तुम्हाला मी केवढा आनंद लुटत होतो.

त्यांचे हे शब्द ऐकून लोकांनी त्यांना शांत केले. चला. काकड आरतीची वेळ झाली. पांडुरंग तुमची वाट पाहात आहेत. लोकांच्या या बोलण्याने प्रल्हादबुवा भानावर आले. आरतीसाठी ते पांडुरंगाच्या गाभाऱ्यात आले. पांडुरंग विटेवर उभे होते. तरीपण नुकतेच पाहिलेले पांडुरंगाचे रूप त्यांच्या अंतःचक्षूपुढून हालत नव्हते. ते आपल्या मनाला विचारत होते पांडुरंगा, भक्तांच्या नामघोषाने भान विसरलेले मघाचेच रूप खरे की भक्तांसाठी विसावलेले हे तुझे रूप खरे? इकडे काकड आरती चालू होती. पण प्रल्हादबुवा आपल्याच विचारात गर्क होते. अजूनही त्यांचे डोळे आनंदाने ओसंडत होते.

आरती संपली. पुन्हा लोकांनी प्रल्हादबुवांना घेरले आणि विचारले, मघाशी तुम्ही कोणता आनंद भोगत होता? अजूनही तुम्ही त्याच आनंदात आहात!

प्रल्हादबुवांनी डोळे पुसले आणि ते बोलू लागले. लोक कान देऊन ऐकत होते. अखेर ते म्हणाले, पांडुरंग **'ज्ञानोबा-तुकाराम'** असे भजन म्हणत होते. मला त्याचं भान राहिलं नाही. मीही त्याच्याबरोबर नाचू लागलो आणि त्यांचा आवडता मंत्र म्हणू लागलो - **'ज्ञानोबा-तुकाराम'** असे म्हणून पुन्हा ते नाचू लागले. जमलेले लोकही त्यांच्या मंत्रघोषात सामील झाले. काही काळ गेला आणि प्रल्हादबुवा थांबले तेव्हा बरोबरच्या लोकांनी **'प्रल्हाद महाराज की जय!' 'प्रल्हाद महाराज की जय !!'** असा घोष केला. प्रल्हाद महाराजांची थोरवी लोकांना कळून आली.

प्रल्हादबुवा देवळात गेल्यावर त्यांची वाट पहात बसलेली त्यांची पत्नी तेथेच जमिनीवर आडवी झाली. तिला चांगली झोप लागली होती. ती स्वप्नामध्ये पहात होती, पांडुरंग स्वतः घरी येऊन घराच्या पायऱ्या चढत आहेत. तर बाहेर प्रल्हाद महाराज घराच्या पायऱ्या चढत होते. काही लोकही त्यांच्या पाठोपाठ येत होते. पांडुरंग घराच्या चारही पायऱ्या चढून आल्याचे लक्ष्मीने स्वप्नात पाहिले आणि त्यांचे स्वागत करण्यासाठी ती पुढे होणार तोच प्रल्हाद महाराजांचा लोकांनी जयजयकार केला. तो घोष ऐकून ती साध्वी

जागी झाली. इतक्या लोकांना अचानक आलेले पाहून तिला किंचीत् लाज वाटल्यासारखे झाले. ती उठून उभी राहिली तोच ती जयघोष ऐकून त्यांची मुलेही समोर आली. जेवायची तयारी करताना मांडलेले ताट तसेच होते. त्याकडे पाहून प्रल्हाद महाराज पत्नीला म्हणाले, जेवायला येतो म्हणून पांडुरंगाच्या मंदिरात गेलो आणि त्याचा पोटभर प्रसाद घेतला. आज पोट कसं तुडुंब भरलं आहे. त्यांचे शद्ब ऐकून लक्ष्मीदेवी म्हणाल्या, एवढा कसला प्रसाद घेऊन येणं झालं. आम्हाला कळलं तर आम्हालाही आनंद वाटेल. प्रल्हाद महाराजांनी त्यांना घडलेली सर्व कथा सांगितली; तर लक्ष्मीदेवींनी त्यांनी स्वप्नात पांडुरंगाला घरी आल्याचं कसं पाहिलं ती कहाणी सांगितली. बरोबरच्या लोकांना ही दुसरी कहाणी ऐकून आश्चर्य वाटलं. तेव्हापासून प्रल्हादबुवांचे 'प्रल्हादमहाराज' झाले आणि तीच बिरूदावली पंढरपूर वासियांनी पुढे प्रेमाने जपली.*

## काशीयात्रा

छत्रपती शिवाजी महाराजांच्या अभिषेकानंतर पंढरपुरी दर्शनास आलेल्या गागाभट्ट आणि त्यांचे सहकारी आणि प्रल्हादमहाराजांची चांगलीच मैत्री जमली होती. काशीक्षेत्री धर्मपीठे आहेत, काशी विश्वेश्वर गंगामाता आहे या सर्वांचे वर्णन ऐकून प्रल्हाद महाराजांना देखील काशीक्षेत्री जाण्याची इच्छा होती. उत्तरेत सर्वत्र मुसलमानी साम्राज्य होते. हिंदूंचा उघडपणे छळ होत होता. जीवित असुरक्षित होते. तर महाराष्ट्रात छत्रपती शिवाजी महाराजांचे राज्य निर्माण झालेले होते. संभाजीराजे गादीवर होते. छत्रपती

* (टीप : 'ज्ञानोबा-तुकाराम' भजनविषयक या प्रसंगावर काहींनी अविश्वास प्रगट केला व 'जय जय रामकृष्ण हरी' हेच भजन म्हणण्याचा हट्ट आग्रह धरला, पण चमत्कार म्हणजे त्यावेळी मृदंगातून बोलच बाहेर पडेनात आणि अखेर 'ज्ञानोबा तुकाराम' नामघोष करताच मृदुंग पुर्ववत वाजू लागला. त्यानंतर पुढे वारकरी संप्रदायात 'ज्ञानोबा-तुकाराम' हा घोष प्रसिद्ध झाला अशीही एक कथा रुढ आहे.)

शिवाजीमहाराजांच्या काळच्या शांततेला दृष्ट लागली होती. या ठिकाणी देखील अस्थिरता स्थिरावत होती. उत्तरेत आणि दक्षिणेत तरी पाहिले तर अस्थिरताच होती. आपण पांडुरंगाची आज्ञा घेऊन निघालो म्हणजे आपणास कोणताही धोका नाही असे प्रल्हादमहाराजांना नेहमी वाटे. अखेर त्यांनी आपला बेत काही आप्त मित्रांना सांगितला. त्यांनाही ही चांगली संधी चालून आली होती. बैलगाड्या करून सहकुटुंब जाण्याचे सर्वांनी ठरविले.

ठरल्याप्रमाणे दहा बैलगाड्या तयार झाल्या. बैलगाड्यांमध्ये सामान भरले. जाताना पांडुरंगाचे दर्शन घेऊन त्याची अनुज्ञा घेऊन जावे अशा विचाराने प्रल्हादमहाराज मंदिरात आले. पांडुरंगाला नमस्कार करून त्यांनी आपल्या प्रस्थानाबद्दल पांडुरंगाला सांगितले. पांडुरंगाच्या मुखाकडे पाहताना त्यांना असे लक्षात आले की नेहमी आनंदघन असणारे पांडुरंग चिंताक्रांत झाले आहेत. काही काळ ते तसेच पांडुरंगाकडे पाहात उभे राहिले आणि पांडुरंगाला म्हणाले, देवा आम्ही काशीयात्रेला निघालो आहोत. तुझा निरोप घेण्यासाठी आलो; पण तुझा चेहरा असा गंभीर का? आम्ही काशीयात्रेला जावे असे तुला वाटत नाही की आपला विरह होणार म्हणून तू उदासीन झालास? प्रल्हादबुवांचे हे म्हणणे ऐकून पांडुरंग म्हणाले, इतके दिवस तूच सर्वांना सांगत आलास की विठ्ठलाच्या पायाशी सर्व तीर्थे आहेत. असे असता तुला काशीला जाण्याची गरज का निर्माण झाली? पांडुरंगाचे हे बोल ऐकून प्रल्हादमहाराजांना भडभडून आले. डोळ्यात जमा झालेल्या अश्रूंना वाट करून देत त्यांनी पंढरीनाथाच्या पायी मस्तक टेकले. पांडुरगांनी आपल्या हातांनी त्यांच्या मस्तकाला स्पर्श केला. त्या स्पर्शाबरोबर प्रल्हादमहाराज काशीक्षेत्री गेले. त्यांनी गंगामातेचे दर्शन घेतले. काशीविश्वनाथाची पूजा केली. काशीनंतर अन्य तीर्थांचेही दर्शन त्यांना त्याच वेळी झाले. बराच वेळ झाला तरी प्रल्हादमहाराज पांडुरंगाच्या पायावर ठेवलेले मस्तक उचलेनात तेव्हा बरोबरचे लोक पुढे झाले. त्यांनी त्यांना उचलले पण त्यांची शुद्ध हरपली होती. पांडुरंगाच्या समोर त्यांना झोपविण्यात आले. पुढे काय होते याची लोक वाट पहात होते. तोच प्रल्हादमहाराज उठून बसले. 'जय गंगामाता' म्हणून त्यांनी हात जोडले. सभोवार पाहतात तो आपण पांडुरंगाच्या मंदिरात आहोत आणि भोवती आपलेच लोक आहेत हे पाहिल्यावर प्रल्हादमहाराज म्हणाले, आत्ता तर मी गंगामातेचे पूजन करून तिला वंदन करीत होतो. सर्व तीर्थे पाहिली आणि

आनंद वाटला. माझे समाधान झाले. ते पुढे लोकांना सांगू लागले - आजपर्यंत मीच लोकांना सांगत असे की जगातली सर्व तीर्थे या पांडुरंगाच्या पायाशी आहेत. पांडुरंगाच्या पायाचे दर्शन घेतले म्हणजे सर्व तीर्थयात्रेचे पुण्य मिळते. असे सांगणारा मीच पांडुरंगाचे पाय सोडून तीर्थयात्रेला निघालो होतो. पण पांडुरंगाने माझा मूर्खपणा ओळखला आणि त्याच्या पायाशी सर्व तीर्थे आहेत याची साक्ष पटविली. मी सर्व तीर्थांचे दर्शन घेऊन प्रयागला आलो. तेथील त्रिवेणी संगमाचे दर्शन घेतले आणि येथे आलो. त्यांचे ते बोलणे ऐकून सर्वांनी पांडुरंगाच्या नावाचा 'पुंडलिक वरदा हरी विठ्ठल' असा जयघोष केला. तेव्हा प्रल्हादमहाराज म्हणाले, लोकहो! गाड्या सोडा! आता कुठेच जावयाचे नाही. इतकेच नव्हे तर आपल्या कुटुंबातील कोणालाही यापुढे काशीयात्रेला जाण्याचे कारण नाही. **'विष्णुपद गया रामनाम काशी । अवघे पायापाशी विठ्ठलाच्या ॥'** प्रल्हाद महाराजांच्या सांगण्याप्रमाणे गाड्यात भरलेले सामान खाली उतरविण्यात आले. झाले. काशीयात्रा सिद्धीस गेली.*

## तुकोबांच्या अभंगगाथेचा प्रसाद

**पा**वसाळा संपला. दिवाळीचा दीपोत्सव संपला. शेतकऱ्यांनी मळ्यातली पिके खळ्यात आणि खळ्यातून घरात आणायला सुरुवात केली होती. सगळीकडे समृद्धीचे राज्य होते. पांडुरंगाच्या भक्तांना आता कार्तिकीची ओढ लागली होती. **'पंढरीचा वारकरी वारी चुको नेदी हरी।'** म्हणून वारकऱ्यांची भावव्यथा सांगणाऱ्या तुकाराम महाराजांना तरी कसे चैन पडेल? आपली पडशी खाद्यावर टाकून तुकाराम महाराज पांडुरंगाचे भजन करीत निघाले. यावेळी त्यांच्या समवेत रामेश्वर भट्ट, सोनबा ठाकूर, महादजीपंत कुळकर्णी, गवरशेठ वाणी, सुदुम्रेकर, कोंडे पाटील लोहोगावकर, संताजी जगनाडे,

*(टीप : आजही प्रल्हादमहाराज वंशातील कोणीही काशीयात्रेस जात नाही. ते पांडुरंगाच्या पायाचे तीर्थ घेऊन काशीयात्रेचे पुण्य संपादन करतात.)

मल्हारपंत कुळकर्णी, गंगाधरपंत मवाळ, नावजी माळी, कान्होबा, शिवभा कासार, मालजी गाडे, आबाजी लोहोगांवकर आणि कोंडोपंत लोहोकरे हे चौदा टाळकरी आणि आणि मंबाजीबुवा गोसावी, अनगडशहा वगैरे भक्तगण देखील होते. मजल दरमजल करीत ते पंढरपूरला आले. प्रल्हाद महाराज आणि अन्य बडवे मंडळींनी गावाच्या वेशीबाहेर महाराजांचे स्वागत करून त्यांना घरी आणले.

कार्तिक एकादशीच्या निमित्ताने पांडुरंगाचे अनेक भक्तगण पंढरीत जमा झाले. नेहमीप्रमाणे सकाळी पाडुरंगाची पूजा अभिषेक झाले. रात्री तुकाराम महाराज पांडुरंगाच्या समोर रंगशिळेवर कीर्तनाला उभे राहिले. मागे त्याचे चौदा टाळकरी उभे राहिले आणि समोर शंकरमहाराज शिऊरकर, रंगनाथ स्वामी निगडीकर, श्रीधरस्वामी नाझरेकर, मंबाजीबुवा, प्रल्हादबुवा बडवे आणि अनेक श्रोतृमंडळी होतीं.

**आता तुम्ही कृपावंत । साधु संत जिवलग ।**
**गोभटे तें करा माझें । भार ओझें तुम्हांसी ।**
**वंचिले तें पायापाशी । नाही यासी वेगळें ।**
**तुका म्हणे सोडिल्या गांठी । दिली मिठी पायासी ॥**

या अभंगावर रसाळ कीर्तन झाले. किती काळ गेला त्याचे भान कोणालाच नव्हते. पहाट झाली तेव्हा कीर्तन संपले.

दुसऱ्या दिवशी एकादशीचे पारणे. प्रल्हाद महाराजांनी सर्वांना भोजन प्रसाद दिला. काला झाल्यावर पांडुरंगाचा निरोप घेऊन तुकाराम महाराज परतले.

पुढे चार महिने लोटले. एकेदिवशी तुकाराम महाराजांनी आपल्या टाळकऱ्यांना सांगितले आम्ही वैकूंठाला निघालो. पांडुरंग माझी वाट पहात उभा आहे. त्यावेळी तुकारामांच्या या वचनाचा अर्थ कोणाला कळला नाही. अखेर फाल्गुन पौर्णिमा संपली आणि वद्य द्वितीयेच्या दिवशी 'आम्ही जातो आमुच्या गावा । आमुचा रामराम घ्यावा ॥' असे म्हणून निरोप घेतला आणि पांडुरंगाने पाठविलेल्या विमानातून तुकाराम महाराज सदेह वैकूंठाला निघून गेले. (शके १५७१ फाल्गुन कृष्ण द्वितीया, सोमवार इ.स. १६४९)

तुकाराम महाराज वैकुंठाला निघून गेल्यावर त्यांचे चिरंजीव महादेव व

विठ्ठल यांना अतिशय उदास वाटू लागले. काय करावे ते सुचत नव्हते. धंदा उद्योग रूचत नव्हता. यामुळे यांच्यामध्ये अशांतता वाटू लागली. अखेर महादेवबुवा म्हणाले मला तुमची धनदौलत धंदापाणी काही नको. माझ्या वडिलांची संपत्ती त्यांनी माझ्यासाठीच ठेविली आहे. मी ती घेतो आणि पंढरपूरला जातो. ठरल्याप्रमाणे तुकाराम महाराजांच्या अभंगाच्या वह्या डोक्यावर घेऊन त्यांनी घर सोडले आणि ते पंढरपूरला आले. प्रल्हाद महाराजांकडे तुकाराम महाराज वैकुंठाला गेल्याची वार्ता पंढरपुरास पूर्वीच आली होती. महादेवबुवांचे स्वागत करीत असता महादेवबुवा म्हणाले, आमच्या वडिलांची धनदौलत घेऊन आलो. असे म्हणून एका पाटावर अभंगाच्या वह्या ठेवल्या. प्रल्हाद महाराजांनी त्यांची यथासांग पूजा केली. मस्तकी स्पर्श करून त्या एका महावस्त्रात गुंडाळल्या आणि उच्चस्थानी ठेवल्या.

महादेवबुवांनी हा ठेवा प्रल्हादमहाराजांच्या स्वाधीन केला आणि काही दिवसांनी ते निघून गेले. प्रल्हादमहाराज रोज गाथा वाचीत. त्यावेळी त्यांचे मन आनंदाने नाचू लागे. कारण त्यांच्या घरी ते रोज श्रीमद्‌भागवत सांगत असत. त्यातील आशय तुकोबांच्या अभंगातून प्रगट झालेला पाहिल्यावर तर त्यांना अतिशय आनंद झाला.*

## पांडुरंग पादुकांचा प्रसाद

संतश्रेष्ठ जगद्‌गुरु तुकोबारायांच्या अभंगगाथेचा त्यांच्या वंशजाकडून मिळालेला प्रसाद प्रल्हादमहाराजांना एक पर्वनीय वाटला. ते भागवताबरोबर नित्य तुकाराम महाराजांची अभंगगाथा नाचू लागले. अभंगा अभंगातून व्यक्त

*(टीप : संत प्रल्हादमहाराजांकडे असलेली तुकोबांच्या अभंगाची गाथा पुढे काही वर्षांनी त्यांच्या वंशजाने स्वप्नदृष्टांत झाल्याने ह.भ.प. गंगूकाका शिरवळकर यांना दिली. पुढे शिरवळकरांच्या फडावरील अंधभक्त बाबूराव देवडीकर यांनी ही गाथा लोकांसाठी प्रसिद्ध केली. वारकरी संप्रदायात देवडीकर कृत हीच 'तुकाराम गाथा' प्रमाण मानली जाते.)

होणारा तुकाराम महाराजांचा विठ्ठलविषयक निष्ठाभाव, त्यांची अलौकिक भक्ती पाहून प्रल्हादमहाराजांच्या डोळ्यातून झरझरा अश्रू टपकत. केवढा हा भक्तीभाव! केवढी ही निष्ठा!! असे म्हणत प्रल्हादमहाराज मनोमन आनंदून जात.

सारीपाट खेळण्यास व श्रीमद्‌भागवत ऐकण्यास पांडुरंग प्रल्हादमहाराजांच्या घरी येत असे व दोघे ऐकमेकाच्या सहवासात रात्र-रात्र घालवित असत. पहाट होई आणि काकड आरतीसाठी देवास मंदिरात जाणेच भाग पडत असे. तेथेही दोघांची भेट होई पण एकांत भेटीची सुख नसे. पांडुरंगाचा दिवसभराचा विरह प्रल्हादमहाराजांना सहन होईना. आपली अवस्था त्यांनी पांडुरंगापुढे कथव केली अन पांडुरंगाने त्या विरहाचे दुःख हलके करण्यास प्रल्हादमहाराज यांना आपल्या पादुका भेट दिल्या होत्या. त्या पादुकाच्या सहवासात प्रल्हादमहाराज पांडुरंगाच्याच अस्तित्वाचे प्रेमसुख भोगू लागले.*

## जीवन साफल्य

प्रल्हादमहाराज रोज श्रीमद् भागवत सांगत असत. या भागवताच्या श्रवणाला अनेक लोक येत असत. त्यामध्ये सामान्य लोक ज्याप्रमाणे असत त्याप्रमाणे व्युत्पन्न पंडितही असत. प्रल्हाद महाराज भागवत सांगू लागले म्हणजे इतके रंगून जात की त्यांना वेळेचे भानही रहात नसे. एकदा त्यांचे प्रवचन चालू असता गुजराथी पद्धतीचा पोषाख केलेला एक भाविक श्रोता म्हणून येऊ लागला. तो प्रवचनाच्या प्रारंभी यायचा. येताना काही फुलं किंवा तुळशीपत्र घेऊन यायचा. भागवताच्या पोथीवर ती वाहून तिला नमस्कार करून लांब

* (टीप : आजही आषाढी पौर्णिमा, कार्तिक पौर्णिमा व विजयादशमीच्या दिनी बडवेमंडळी पंढरीनगरीतून या पादुकांची पालखीतून मिरवणूक काढतात. आषाढी-कार्तिक महायात्रेच्या काळात ज्या भाविकांना विठ्ठलदर्शन घडत नाही असे भाविक वारकरी या पादुकांचे दर्शन करून विठ्ठलदर्शनाचे सुख अनुभवतात.

दरवाज्याजवळ एका खांबाला टेकून बसत असे. अत्यंत स्वस्थ चित्ताने तो भागवत श्रवण करी. सर्व लोक निघून गेले की बाहेरच्या उंबरठ्याला हात लावून तो नमस्कार करी आीण निघून जाई. कोणाची ना ओळख ना परिचय. एकदा कोणीतरी त्याला विचारले तेव्हा तो मोडक्या तोडक्या मराठीत म्हणाला, आम्ही तिकडे लांब राहतो. काठेवाडी ब्राह्मण आहे. धंदाउदीम करण्यासाठी म्हणून बाहेर पडलो. फिरता फिरता इकडे आलो तो कळले की इथले एक पंडित भागवत वाचतात म्हणून. श्रवणाला आलो. धंदा उदीम करताना वेळ कुठला मिळायला. पण एकडे आलो आणि वेळ मिळू लागला. आम्हाला श्रीकृष्णाचे भागवत फार फार आवडते. तेव्हा लोक म्हणाले - मग कसला धंदा करता?

डोक्यावर कापड घेऊन खेडेगावातून विकतो. इथले लोक अति सज्जन.

आणि राहता कुठे?

गोपाळपुरात राहतो. आम्ही दोघंच राहतो तिथं.

तिथून येता रोज?

होय ना! आम्हाला भागवत फार आवडते म्हणून येतो.

तुम्ही इतक्या श्रद्धेने येता. मग इतके मागे का बसता? पुढे बसावे की नाही. प्रल्हादमहाराजांना पण आनंद वाटेल.

इकडे ब्राह्मण अतिशय बुद्धीमान आहेत. त्यांच्यासाठी पुढं जागा असते. आम्ही फार शिकलो नाही म्हणून मागे बसतो.

होता होता चातुर्मास संपत आला. प्रल्हादमहाराजांनी पारणे करण्याचे ठरविले. सर्वांना भोजनासाठी बोलावले. भोजनाला तो ब्राह्मण मात्र आला नाही तेव्हा प्रल्हादमहाराजांना आश्चर्य वाटले. तो ब्राह्मण का बरे आला नाही म्हणून त्यानी पृच्छा केली. पण त्यांना त्याबद्दल काहीच समजले नाही. दुसऱ्या दिवशी नेहमीप्रमाणे नैवेद्य घेऊन तो पांडुरंगाला समर्पण करण्यासाठी ते मंदिरात आले. पांडुरंगाच्या समोर नैवेद्य ठेवून तो समर्पण केला आणि ते पांडुरंगाला म्हणाले, देवा तो काठेवाडी ब्राह्मण काल भोजनाला आला नाही. त्याला आपला प्रसाद मिळावा म्हणून माझी प्रार्थना आहे. तो कोठे गेला हे कळले नाही. रात्री तो ब्राह्मण त्यांच्या स्वप्नात आला आणि म्हणाला तुमचा

प्रसाद पावला. स्वप्नातच प्रल्हादमहाराजांनी हात जोडून त्याला नमस्कार केला तेव्हा तो ब्राह्मण नाहीसा होऊन तेथे पांडुरंग दिसू लागले. ते हसत हसत म्हणाले, मलाच तुझे रसाळ भागवत ऐकायचे होते. त्या गोपी, ते गोप, ती यमुना आणि तेथे केलेले पुष्कळ खेळ ऐकता ऐकता मी स्वतः अगदी आनंदून गेलो. तुझ्याकडे अनेक भक्त येत. उंबरठ्यात बसून त्यांच्या पायाची धूळ कपाळाला लावण्यात मला केवढा आनंद होता म्हणून सांगू!

स्वप्न संपले. प्रल्हादमहाराजांना जाग आली. एकीकडे त्यांना अतीव आनंद झाला होता तर पांडुरंगाला आपण ओळखले नाही व काही सेवा करता आली नाही म्हणून वाईटही वाटत होते. नंतर ही गोष्ट चार चौघात झाली. प्रल्हादमहाराजांचा अधिकार आणि भक्ती याची सर्वांनाच प्रचिती आली. यानंतर सुद्धा प्रल्हादमहाराज रोज एकटेच भागवत वाचत असत. परंतु त्यावेळी त्यांच्या उजव्या हाताला एक मोकळा पाट ठेवून त्यावर आसन घातलेले असे. त्याला भागवत वाचण्यापूर्वी आणि वाचून झाल्यावर प्रल्हादमहाराज वंदन करीत आणि तो पाट देवघरात नेऊन ठेवीत.

## संन्यासाश्रम

शके १६४० उजाडले. चैत्र प्रतिपदेचा गुडी पाडव्याचा सण झाला. प्रल्हादमहाराजांनी ९७ व्या वर्षात पदार्पण केलेले होते. आपले जीवनकार्य संपलेले आहे याची त्यांना मनोमन जाणीव झाली होती. हिंदूजीवन पद्धतीमध्ये ४ आश्रमांना विशेष स्थान आहे. ब्रह्मचर्य, गृहस्थाश्रम, वानप्रस्थाश्रम या तीन आश्रमांचे मोठ्या काटेकोरपणे प्रल्हादमहाराजांनी आचरण केलेले होते. वानप्रस्थाश्रमाच्या निमित्ताने जनताजनार्दनास सोडून वनात न जाता त्यांनी अयाचित वृत्तीने भाविकांना भागवतकथा सांगत आपला हा तिसरा आश्रमधर्म पालन केला होता. आता संन्यास या चतुर्थाश्रमाचा त्यांना वेध लागला होता.

संत ज्ञानदेवांचे वडील विठ्ठलपंत यांना ज्या 'रामानंद स्वामी' यांनी अनुग्रह दिला त्याच रामानंदाचे प्रशिष्य अब्दयानंद यांजकडून

प्रल्हादमहाराजांनी संन्यासआश्रमाची दीक्षा घेतली. संन्यास ग्रहण केल्यानंतर त्यांचे नाव 'चिदानंद स्वामी' झाले पुढे संतकवी श्रीधर नाझरेकर यांनीही अव्द्यानंद यांच्याकडून संन्यास दीक्षा घेतली आणि प्रल्हादमहाराज व श्रीधर स्वामी गुरूबंधू झाले.

प्रल्हादमहाराजांच्या जीवनाची संध्याकाळ झाली होती. जीवनसूर्य क्षितीजाकडे जात होता. वयही शंभरीकडे झुकले होते. तशाही स्थितीत त्यांची दृष्टी आणि श्रवणशक्ती तीव्र होती. त्यामुळे भागवताची पाठसेवा चालू होती. एके दिवशी त्यांना वाटले, शरीराचा खोळ आता जीर्ण झालेला आहे. आता तिचा भरवसा नाही. तेव्हा भगवंताच्या चरणी ही खोळ अर्पण करावी.

## महानिर्वाण

**मा**घ महिना उजाडला. पौर्णिमा होऊन गेली. प्रल्हादमहाराजांनी ठरविले की आता उत्तरायण चालू झाले आहे. सर्व संतांनी आपले देह वद्य पक्षातच सोडले. ज्ञानेश्वर महाराज, एकनाथ महाराज, तुकाराम महाराज, नामदेव कोणीच याला अपवाद नाही.

माघ वद्य नवमीच्या दिवशी सकाळी प्रल्हादबुवांनी चंद्रभागेचे स्नान केले. पांडुरंगाची पूजा केली आणि आपला मनोदय त्याला सांगितला. पांडुरंगाच्या देवळासमोर एक पिंपळवृक्ष होता. या वृक्षाखाली पांडुरंगाकडे मुख होईल असे आसन घातले. पुढे चौरंगावर भागवताची पोथी ठेवली. तिचीपण मनोभावे पूजा केली. दशमस्कंधाचे पहिले पान हाती घेतले. आपले आई-वडील-गुरुवर्य आणि भगवान श्रीकृष्ण यांना आदराने वंदन करून ते वाचू लागले -

**ॐ नमो भगवते वासुदेवाय । अथ प्रथमोऽध्यायः ।**
**राजोवाच-कथितो वंशविस्तारो भवता सोमसूर्ययोः।**
**राज्ञां चोभयवंश्यानां चरितं परमाद्भुतम् ॥**

पहिला दिवस संपला. दशमीचा दिवस संपला. एकादशीचा पवित्र दिवस उगवला. प्रल्हादमहाराजांनी भाविकांना सांगितले - मध्यान्ही मंदिरात या. भागवताची समाप्ती आहे. प्रल्हादमहाराज भागवताच्या दशमस्कंधाचे पारायण करीत आहेत असे समजल्यावरून पंढरीतील अन्य लोकही श्रवणार्थ येऊन

बसत असत. एकादशीच्या दिवशी समाप्ती आहे म्हणून श्रोत्यांनी गर्दी केली होती. गावातील त्याप्रमाणे परगावची मंडळीही तेथे जमा झाली होती. प्रल्हादमहाराज नेहमीप्रमाणे देवळात आले. पांडुरंगाची पूजा करून ते बाहेर आले. आपल्या आसनी बसले आणि वाचू लागले. एकेका श्लोकाबरोबर श्रोत्यांच्या मनालासुद्धा श्रीकृष्णाच्या लीलांनी तन्मय करून टाकलं होतं. शेवटच्या नव्वदाव्या अध्यायाला प्रारंभ झाला. लोक भारावलेल्या स्थितीत स्वस्थ झाले होते. अखेर सूर्य मध्यान्ही येण्यास काही क्षण असताना प्रल्हादमहाराजांनी

**मर्त्यस्तयानुसमवेधितया मुकुन्द श्रीमत्कथाश्रवणकीर्तनचिन्तयैति ।**
**तद्धाम दुस्तरकृतान्तजवापवर्गं ग्रामाद्वनं क्षितिभुजोऽपि ययुर्थदर्थाः ॥**

हा श्लोक वाचला त्यानंतर

**इति श्रीमद्भागवते महापुराणे दशमस्कंधे उत्तरार्धे श्रीकृष्णचरितानुवर्णनं नाम नवतितमोऽध्यायः ॥**

असे म्हणून हात जोडले -

**वसुदेवसुतं देवं कंसचारूणमर्दनम् ।**
**देवकी परमानन्दं कृष्णं वन्दे जगद्गुरुम् ॥**

असा श्लोक म्हणून बरोबर आणलेले पांडुरंगचरणाचे तीर्थ प्राशन केले. पुन्हा हात जोडून सर्वांना नमस्कार केला आणि -

**ॐ नमो भगवते वासुदेवाय ।**

असा तीन वेळा मंत्रोच्चार करून वंदन करण्यासाठी पोथीवर डोके टेकले. क्षण दोन क्षण गेले. पळे गेली. पण प्रल्हादमहाराज पोथीवर ठेवलेले डोके उचलेनात. तेव्हा त्यांचा पुत्र रामचंद्र पुढे झाला. त्याने मस्तकाला हात लावून ते उचलले; पण व्यर्थ. कारण प्रल्हादमहाराजांनी आपला देह पांडुरगाच्या चरणी अर्पण केला होता. (शके १६४० माघ वद्य एकादशी बुधवार मध्यान्ही) मध्यान्हीचा सूर्य हे सर्व न्याहाळीत होता.

प्रल्हादमहाराजांनी देह सोडल्याची वार्ता गावात पसरली. लोक धावत आले. त्यांनी त्यांच्या पवित्र पार्थिव देहाचे दर्शन घेतले. टाळमृदुंगाच्या नादात आणि पंढरीनाथांच्या जयघोषात सर्वांनी तो पार्थिव देह चंद्रभागेच्या तीरी आणला. तुळस बुक्का वाहून त्याची पूजा केली. प्रल्हादमहाराजांच्या पार्थिव

देहाच्या पावित्र्याचे चिरंतन रक्षण व्हावे म्हणून बडवे मंडळींनी तेथेच त्यांची समाधी बांधली. त्यानंतरच्याकाळात प्रल्हादमहाराजांनी विठ्ठलमंदिरासमोर ज्या जागी देह ठेवला तेथे त्यांच्या जीवनकार्याचे स्मरण म्हणून भाविकांनी संगमरवरी तुळशीवृंदावन बांधले. हे स्मृतीवृंदावन आजही विठ्ठलमंदिरात प्रवेश करताच आपणास प्रल्हादमहाराज बडवे यांच्या कार्याची .मूकपणाने महती सांगत उभे आहे.





विठ्ठल मंदिरातील स्मृतीवृंदावन

# परिशिष्ट

## प्रल्हादमहाराजांची गुरुपरंपरा - १




टीप : प्रल्हाद महाराज यांच्या दोन गुरुपरंपरा मिळतात.

(वरील पूर्ण परंपरेचे मुख्य पीठस्थान गेल्या 300 वर्षांपासून सुर्जी अंजनगाव जि. अमरावती येथे स्थिर झाले. यापूर्वी ते फिरते होते. ही पट्टाभिषेकाची गुरु शिष्य परंपरा)

# श्री प्रल्हाद महाराज बडवे यांची वंशावळ

● वंश खंडीत






रामचंद्रअण्णा, दादामहाराज चातुर्मासे गुंडमहाराज देगलूरकर मोरोपंत हे मित्र होते. ([illegible]) १७६९

## प्रल्हादमहाराजांची गुरुपरंपरा-२




**प्रल्हाद महाराजांचे शिष्य -** १) गुरू गोपाळ सखा, २) हरिकृष्ण गोसावी, ३) सदाशिव, ४) कृष्णानंद, ५) बहिरागी बाबा ६) राघोदास, ७) अनंतस्वामी, ८) सच्चित्सुख, ९) केशवस्वामी, १०) बापुजी पंत, ११) काकोबा सराफ, १२) विठ्ठलस्वामी, १३) गुरजरस्वामी, १४) खिस्ते महाराज

(परिशिष्ट - ४)

माधवदास कृत

# संत प्रल्हादमहाराज यांची आरती

शिवतनये वर्णाश्रम पालियले नामी।
गृहस्थ आश्रमी असता रतले हरिनामी।
बडवे भक्त शिखामणी प्रल्हादस्वामी।
भक्तिबळे खेळविती प्रभू अंतर्यामी।
जयदेव जय देव जय प्रल्हाद स्वामी।।१।।

परिसा भागवत होता रुक्मिणीचा भक्त।
बुद्धिबळे हरिला तुम्ही रुक्मिणीचा कांत।
योगीजनांच्या कधीहि येईना ध्यानांत।
तो हरि पुराण तुमचे ऐके साद्यंत।।२।। जयदेव...

ही पुंडरीकनगरी अविनाशी काशी।
सर्व जगातील तीर्थे मम चरणापाशी।
जाऊ नको मज सोडूनी हरि सांगे तुजसी।
अद्यापि तव्दंशी जाती न काशी।।३।। जयदेव...

कुलदैवत वंशीचे माहूरची आओी।
पंढरीनाथा मजला आज्ञा ही देओी।
जाऊनि घेऊनि येतो सांगुनि वृत्तांत।
एकविरा जगदंबा प्रगटे पंढरीत।।४।। जयदेव...

त्रेतायुगी श्रीरामे भरता पद दिधले।
द्वापारी श्रीकृष्णे उद्धवासी दिधले।
कलिमाजी प्रल्हादा विठ्ठलपद दानि।
शिबिकेमाजी मिरविती बडवे घेऊनि।।५।। जयदेव...

अनुभवामृत हा ग्रंथ गोड केला।
त्या अैकाया श्रोता पांडुरंग पहिला।
सांगे उद्धराया श्री पंढरीशाला।
माधवदास असे हा शरणागत आपुला।।६।। जयदेव...

◆◆◆

(परिशिष्ट - ५)

# ऐतिहासिक दस्तऐवज

प्रल्हाद महाराज बडवे यांनी विठ्ठलमूर्ती रक्षणार्थ केलेल्या कार्याचा ऐतिहासिक पुरावा. खालील दस्तऐवज इतिहास संशोधक कै. ग. ह. खरे यांनी भारत इतिहास संशोधन मंडळ पुणेच्या शिवचरित्रसाहित्य खंड ११ मध्ये प्रकाशित केलेले आहेत. पंढरपूर इतिहास संशोधन मंडळाचे चिटणीस कै. शंकरराव रामचंद्र बडवे यांनी हे दस्तऐवज कै. खरे यांना उपलब्ध करून दिले होते.

## (भा. इ. सं. मंडळ पुणे)

## शिवचरित्रसाहित्य ११ वा खंड

**ले. ५ श. १६१७ आश्विन शुद्ध ५** — ५६ — **श. १६१७ आश्विन शुद्ध ५ इ. १६९५ ऑक्टोबर २**

राजश्री सूर्याजी पाटील व रामाजी कुलकर्णी प्रगणे देगांव बुदुक प्रांत मोहोळ यांसी समस्त पांढर जमा होऊन लिहून दिधले जे धामधुमीमुळे श्रीच्या मूर्ति बडव्यांनी तुमच्या गावास लष्करचा उपसर्ग न लागावा म्हणून आणिल्या आसियां समयास तुम्ही दिलात घेतेवेळी श्रीच्या मूर्ति अवघ्या पांढरीच्या असता तुम्ही काय निमित्त मुरती आणिल्या यास्तव आम्ही समस्त गाव आल्यावाचून मुरती ठेवण्यास आश्रा देत नाही यावरून गोपाळ भट बडवे यांनी तमाम गाव जमा करून सर्वांस हकीगत बोलिले आवघे बुडकरी व ब्रह्मवृंद व शेटे व महाजन वाणी बकाल व तमाम गाव पाणी विचार केला की देव बडवे याचा त्याणी पाहिजे तिकडे न्यावा त्याजवर गावानी दुराई होऊ नये असे म्हणे मग गोपाळभट बडवे म्हणाले तुम्ही पाटील कुलकर्णी यांसी लिहून घ्यावे मग सरवाचे विचार हे लिहून दिले. मिति शके १६१७ आश्विन शुद्ध ५ बी कलम

आपाजी ताठे
सदाशिव हरि कोमटी
नागना शेट
पांडोबा फाले
मारुती न्हावी
दाजीबा लाड
लपबा सुतार
जोधराम मारवाडी
गरमा जाधव
कासीनाथ नवी

वामनभट बिन तात्याभट
शेरांभट
हरभट बिन सदाशिव पुराणीक
बाळकृष्ण विठ्ठल ताठे
गणूबाबा रामदाशी
गोपाळभट आराध्ये
सखाराम बिन राजबा भुतार
दयालदास बेरागी
पांडुरंग हरि

शामजी हरदास
नागू राढासापा
आण्णाजी उद्धव
भुजंगप्पा शेटे
गजानन आवसरी
मारुती गोपाळा

| | | |
|---|---|---|
| ले. ६ श. १६२१ | ५७ | श. १६२१ कार्तिक शुद्ध १ |
| कार्तिक शुद्ध १ | श्री | इ. १६९९ ऑक्टोबर १३ |

राजश्री सूर्याजी पाटील मौजे देगाव प्रांत मोहोळ याशी

अवघे लिहून दिधले आम्ही लश्करचे धामधुमीमुळे श्रीच्या मुरती तुमचे घरी ठेवून मुसरुषा करून होतो. पुढे धामधूम शांत झाल्यावर आम्ही श्रीस घेऊन चाललो त्यास तुम्ही बोलिला जे तुम्ही आम्हास श्रीदेवांस नेल्याचा कागद लिहून द्या असे बोलिल्यावरून हा कागद लिहून दिधला सही कार्तिक शुद्ध पाडवा शके १६२१

स्वहस्त नारो गोविंद बडवे
गोपाळ विठ्ठल बडवे
हस्ताक्षर नरहर रामाजी बडवे
हस्ताक्षर धोंडू नानाजी बडवे

प्रल्हाद शिवाजी बडवे
स्वतहा सदोबा बडवे
सही तुळशीराम बडवे

(परिशिष्ट - ६)



**प्रल्हाद महाराज यांच्या पूजेतील देव !**

(सध्या या मूर्ती प्रल्हाद महाराज यांचे वंशज श्री. अनिल शंकर बडवे याच्या देवघरात आहेत)

(परिशिष्ट - ७)

# प्रल्हाद महाराजकृत पांडुरंगाची आरती

शरणागत तव चरणा भजवरी करी करुणा।
अशरण शरणा देई मज निज पदी चरणा।
माया वरणा दुरी करी तापत्रय हरणा।
भवभय चुकवी मम जन्म मरणा।
जयदेव जयदेव विठ्ठल गुरुनाथा।
तव पद पंकज युग्मी विलसो मम माथा।।धृ।।

निर्गुण परि सगुणत्वे रूपासी येसी।
तैसे रूपारूप हे न घडे तुजसी।
जे जे जैसे भावति त्या तैसा होसी।
अनन्य भावे शरण निज पद त्या देशी।।२।। जयदेव...

सांडुनि काया माया मज पंढरीराया।
फिरसी वाया चुकवि ये आणि जाया।
होया गुरुपद प्राप्ति करि हा उपाया।
शिवसुत वंदीत भावे विठ्ठल गुरू पाया।।३।। जयदेव...

(टीप : ही आरती आजही विठ्ठलमंदिरात नित्य म्हटली जाते)




प्रल्हाद महाराज यांच्या घरी भागवत ऐकण्यास श्री विठ्ठल येत असे. त्या प्रसंगावरील एक प्रचलित चित्र

'अमृतगाथा' ग्रंथास हार्दिक शुभेच्छा

# भीमा सहकारी साखर कारखाना लि.

टाकळी–सिकंदर, ता. मोहोळ (जि. सोलापूर)

## ठळक वैशिष्ठ्ये

१) स्थापना : ९–८–१९७४

२) उभारणी सुरू : १९७८ साली.

३) सन. १९७८ ते ८६ पर्यंत पूर्वीच्या व्यवस्थापनाच्या उधळपट्टीमुळे कारखाना कोटयावधी रुपयांनी तोटयात आला

४) हा मोडकळीस आलेला कारखाना २४–८–१९८६ रोजी मा. आमदार सुधाकरपंत रामचंद्र परिचारक यांनी ताब्यात घेतला.

५) मा. आमदार सुधाकरपंत परिचारक यांचे काळातील गळीताचे उच्चांक व प्रगतीची घोडदौड

| सिझन | गळीत मे. टन |
|---|---|
| १९८६–८७ | १,७६,२८१.३७६ |
| १९८७–८८ | २,७८,१०९.०७२ |
| १९८८–८९ | १.८६,४९७.७५४ |
| १९८९–९० | ३,४२,३९९ ९०४ |
| १९९०–९१ | ३,५४,४१७ ३६५ |
| १९९१–९२ | ३,५०,२६९.९२२ |
| १९९२–९३ | २,८३ ७५२ ५५८ |

६) गाळप क्षमतेच्या बाबतीत महाराष्ट्रात **'दुसरा क्रमांक'**

७) वित्त संस्थांची प्रचंड थकीत रकमेची संपूर्ण परतफेड केली.

८) बँक ऑफ महाराष्ट्राचा पुनर्वसन प्रस्ताव मंजूर. कारखाना लवकरच कर्जमुक्त होणार.

९) सुधारीत जातीचे ऊस लावगडीसाठी शेतकऱ्यांना ऊस अनुदान योजना.

१०) दरमहा सभासदांना साखर वाटप.

११) सोलापूर जिल्हयातील इतर कारखान्यांबरोबर उसाचा दर.

१२) सोलापूर जिल्हयात 'मानाने मान' डोलविणारा सहकारी साखर कारखाना.

**आमदार सुधाकर रामचंद्र परिचारक**
(चेअरमन)

**श्री. बी. एस. मोहिते**
(प्र. कार्यकारी संचालक)

**श्री. पंढरीनाथ भाऊराव गावडे**
(व्हा. चेअरमन)

आणि सर्व संचालक मंडळ



शिवजनक जयाचा पार्वती माय ज्याची ।
कुलवश बडव्यांचे वृत्ती त्या पंढरीची ।
हरीपद वश केले विठ्ठलाते स्मराया ।
मम नमन असो त्या भक्त प्रल्हादराया ।



प्रल्हादमहाराज यांची चंद्रभागेच्या तीरावरील समाधी.